॥ श्रीगणेशाय नमः ॥

# देवमामलेदार

अथवा

# दातृत्व विलास.

(ऐतिहासिक नाटक.)

शतेषु जायते शूरः सहस्रेषुच पंडितः ।
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वानवा ॥

हें पुस्तक

विश्वनाथ भास्कर किरकिरे.

यांनीं लिहिलें

तें

कल्याण येथील 'लक्ष्मीवेङ्कटेश्वर' छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.

सन १९०३.

कल्याण.

किंमत १० आणे.

रा. रा. डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन
सोसायटी पुणे — सेक्रेटरी साहेब — यांज-
कडे. ग्रंथ करण्यास उत्तेजन मिळावें
ह्या हेतूनें पाठविलेलें पुस्तक.

विश्वनाथ भास्कर शिरकेरे
कल्याण जि. ठाणे.






# प्रस्तावना.

शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पंडितः ॥
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वानवा ॥ १ ॥

देवमामलेदार, हें प्रत्येक महाराष्ट्रियांच्या कर्णाला गोड लागणारें नांव आहे. असें त्या नांवावरूनच कळण्या सारखें आहे. हा महाउदार पुरुष नुकाच सोळा सत्रा वर्षांपूर्वी आमच्या ह्या महाराष्ट्राला भूषित करून गेला असल्यामुळें, लोकांना त्याच्या विलक्षण औदार्याची विस्मृति पडली आहे असें नाहीं. ज्यानें आपल्या अतर्क्य दातृत्वानें सर्व जगास थक्क करून तोंडांत बोट घालावयास लावलें, व राजकर्ते आणि प्रजाजन या दोघांकडूनहि सन्मान युक्त शाबास, शाबास म्हणून घेतलें, त्याचें लोकांस वारंवार यथोचित स्मरण होणें, हें आमच्या मानासिक उन्नतिस किती अवश्यक आहे तें आतां कोणांस सांगावयास पाहिजे असें नाहीं.

अलिकडे साधुपुरुषांचीं नाटकें लिहून, तद्वारें लोकांच्या मनाचा कल भक्तिमार्गाकडे वळविण्याचा जो प्रयत्न चालला आहे, त्याचेंच हेंहि स्वरूप आहे. इतर प्रयत्नांत आणि यांत भेद इतकाच कीं, आमच्या नाटकांतील नायकाचे ठिकाणीं दातृत्व हा सर्व गुणांवर तेज पाडणारा गुण, असल्यामुळें, भक्ति हा जसा इतर साधु पुरुषांच्या ठिकाणीं, मुख्य गुण, आढळतो, तसा तो याच्या ठिकाणीं नव्हता. भक्तिच्या पाठीस याला लागावें लागलें नाहीं. भक्तिच दासी होऊन याच्या पाठीस लागली होती. 'भक्ति करा, भक्ति करा!' असें लोकांस मुळींच न सांगतां, या उदार पुरुषास लोक लवकरच देव समजून, त्याचीच भक्ति करूं लागले. भक्तिचा महिमा, या नाटकांत अशा प्रकारचा सांपडणार आहे. इतर साधु पुरुषांचा, जसा लोकांकडून छळ झाला, तसा प्रकार यांत फारसा नाहीं. कारण नायकाच्या ठिकाणचा गुण तशा छळास अर्थातच विरुद्ध आहे. तरी वसंतऋतूंतील पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें सर्वांस आनंद देणाऱ्या या परम भाग्यशाली उदार पुरुषावरहि थोडींशीं संकटांचीं अभ्रें

आलीं होतीं. ह्या नाटकांत हा एक विशेष दिसून येणार आहे कीं, इतर नाटकांप्रमाणें तींच तींच पात्रें पुन्हां पुन्हां बहुधा आलीं नाहींत. याचें कारण उघडच आहे कीं, आमच्या या नाटकांतील नायकाचें वास्तव्य फारकरून नोकरीच्या संबधानें, व नंतर दुसऱ्या अनेक कारणानीं एका जागीं नव्हतें. ह्या मुळें ह्या जगत्कुटुंबी पुरुषाच्या नाटकांत, पात्रें दर प्रवेशांतलीं बहुतकरून निरनिराळीं आलीं आहेत.

हें नाटक आम्ही महाराजांच्या चरित्राच्या आधारानें तयार केलें आहे, चरित्रकारांनीं मिळवून ठेवलेली सामग्री आमच्या आयतीच उपयोगी पडली, याबद्दल आम्ही चरित्रकारांचे आभार मानतों. परंतु ह्या नाटकांत, चरित्राबाहेरच्या अशा कांहीं दंतकथाही उपयोगांत आणल्या आहेत. जसें महाराजांनीं तिजोरिंतून रुपये काढून घेणें, व ते ट्रेझरी इन्स्पेक्टर तपासायला आले असतां, बरोबर भरणें. दुसरें–महाराजांनीं स्वतःची पत्नि बैराग्याच्या हवाली करणें. आतां ह्या दोन्ही दंतकथा, जरि निव्वळ खोट्या धरल्या, तरि पहिली पासून महाराजां विषयींची त्यांच्या कांहीं वरिष्ट अधिकाऱ्यांची तेढी, आणि त्यायोगें महाराजां विषयीं, युरोपियन अधिकाऱ्यांच्या मनाचा निष्कारण वाईट ग्रह किती बलवत्तर झालेला होता, व महाराजांची प्रत्यक्ष भेट होतांच, त्या ग्रहांची कशी इतिश्री होत असे, इतकें जर या अतिशयोक्तिनें कळून येण्या सारखें असलें, तर ती नाटकांत तरि निदान शोभण्या सारखी नाहीं असें सहसा कोणाच्यानें म्हणवणार नाहीं. दुसऱ्या दंतकथे विषयीं तरि असेंच आहे. महाराजांच्या ठिकाणीं असलेल्या, अतवर्य दातृत्वाची जर एकाद्या कठिण हृदयालाहि पाझर आणण्या सारखी ती असेल, तर ही बिचारी दुसरी अतिशयोक्तिहि रसिकांच्या क्षमेला पात्र होईल. तसेंच या नाटकांत जीं मोठमोठ्या अधिकाऱ्यांचीं भाषणें घातलीं आहेत त्यास आधार, फक्त महाराजांचा त्या त्या अधिकाऱ्यांनीं चरित्रांत सन्मान केल्याचें लिहीलें आहे. भाषणास फारसा आधार त्यांत नाहीं, तरी त्या त्या वेळच्या त्या त्या

अधिकाऱ्यांच्या मनोवृत्ति महत्वाच्या जाणून, त्यांचीं भाषणें नाटकाला साजेशीं घातलीं आहेत. असो, नाटकाच्या सोयी करतां मुळांत क्वचित फेरफारही केला आहे.

याचे सहा अंक केले असून, भक्ति शृंगार, करुण, हास्य, शोक, वगैरे रस यांत मुख्यतः आहेत. या नाटकाचा प्रयोग पाहिल्यानें किंवा हें वाचल्यानें जर पहाणाराच्या किंवा वाचणाराच्या वृत्तिवर उदात्तत्वाचा पगडा बसला, तर लेखक आपल्या श्रमाचें सार्थक झालें असें मानील.

शेवटीं येथें इतकें लिहीणें अवश्य दिसतें, किं जर आमचे बंधु चि. रा. गजानन भास्कर किरकिरे यानीं आमची उठावणी केली नसती, तर हें नाटक अर्धेच पडून राहिलें असतें. असो, ज्यानें आपले निर्मळ यश गाण्यांत मला यशस्वी केलें, त्या श्री यशवंतराव महाराजांचें चरणीं नम्र होऊन ही प्रस्तावना पुरी करतो.

कल्याण. विजया दशमी
ता. १ । १० । १९०३

**नाटककर्ता.**



# या नाटकांतील मुख्य पात्रें.

## पुरुष.

१ महादेवपंत .... .... .... यशवंतरावांचे वडील.
२ यशवंतराव महाराज.... .... एक प्रसिद्ध व लोकप्रिय मामलेदार.
३ जयाजीराव शिंदे .... .... ग्वालेर संस्थानचे अधिपति.
४ तुकोजीराव होळकर .... इंदूरसंस्थानचे अधिपति.
५ सर वुइल्यम रॉबर्ट .... .... मुंबई इलाख्याचे गव्हर्नर.
६ अशबर्नर .... .... .... .... कमिशनर.
७ आर्स्किन .... .... .... नाशिक जिल्ह्याचे कलेक्टर.
८ माधवराव .... .... .... महाराजांचे कारकून.
९ नारायण .... .... .... महाराजांचा पुतण्या.
१० काळु .... .... .... .... महाराजांचा गडी.
११ निरंजनगुरु .... .... .... .... एक गोसावी.
१२ सन्ना चौधरि .... .... .... पाटण गांवचा पाटील.
१३ कोन्हेर .... .... .... .... एक मुनसफ.
१४ सखाराम गावडे .... .... तुकोजीराव होळकरांचे शालक.
१५ मोहनमास्तर .... .... .... .... एक तालीमबाज.

## स्त्रिया.

१६ हरिबाई .... .... .... .... यशवंतरावांची आई.
१७ सुंदराबाई .... .... .... यशवंतरावांचें कुटुंब.
१८ सखुबाई .... .... .... .... यशवंतरावांची बहिण.
१९ भागिरथीबाई .... .... .... तुकोजीरावहोळकरांची मोठी राणी.

या शिवाय नथ्थेखा; जोरावरसिंग; फुलवाला; इतर स्त्रिया. इ०इ०

श्रीगजानन प्रसन्न.

# देव मामलेदार

अथवा

# दातृत्व विलास नाटक.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

( स्थळ-अंमळनेरांतिल एक रस्ता. दोन गृहस्थ बोलत येतात. )

**पहिला गृहस्थ**–लग्न घरीं जसा आनंद वाटतो, तसा या अंमळनेरांत हल्लीं जिकडे तिकडे आनंदी आनंद आहे महाराजांची येथें बदली झाल्या पासून.

**दुसरा गृहस्थ**–मला तर नेहमीं या गांवांत दिवाळीच भासते.

**पहि०**–अहाहा ! काय मजा आहे ! रोज सण आहे या गांवाला ! गोकुळांत श्रीकृष्णाच्या वेळीं अशीच मौज असेल नाहीं ?

**दुस०**–बरोबर कल्पना केलीत. श्रीकृष्ण कलियुगांत देव मामलेदारांच्या रूपानें अवतरले, असेंच कां म्हणाना !

**पहि०**–ऐका. हा किनरीवाला आपली किनरी किती मधुर वाजवित आहे ! मला वाटतें, या मधुर आवाजांतून सुद्धां महाराजांचें यश प्रविष्ट झालें आहे. त्या शिवाय इतकी गोड किनरी या किनरीवाल्याला वाजवितां येणेंच अशक्य.

**दुस०**–खरोखर अशक्य. अहाहा ! या मधुर अवाजानें वेडावून जाऊन, आपल्याला तर बुवा नागा सारखें डुलतच राहवेसें वाटतें.

**पहि०**–अहो मग हा गोंधळ्याचा पवाडा तुम्हांला कोणत्या

गोंधळांत घालिल पहा बुवा ! आपल्या चित्तवृत्ति तर गोंधळून गेल्या अगदीं. ब्रह्मानंद असाच असेल का हो ?

दुस०–छे, ब्रह्मानंदाची इच्छाच करित नाहीं आपण. कारण तो या पेक्षां कमीच असला पाहिजे. ( कान दिल्या सारखें करून) ऐका हा डमरू ! चला जरा पुढें ! आपण असेच गांव भटकत राहणार दिवसभर !

पहि०–या डिडिम डिडिम नादानें कर्णांला किती आनंद होत आहे ! हा डमरु वाजवणारा प्रत्यक्ष शिवच असला पाहिजे.

दुस०–कसा काय हा शंख वाजवला या जंगमानें ? ब्रह्मरंध्र यानें माझें मोकळें केलें !

पहि०–आनंद सांठवा त्यांत, त्यापासून उत्पन्न झालेला. ऐका, आतां तंबुरी सुरू केली या गुलामानें ! कशी लावतो आहे पहा ! प्रत्येक रोमन् रोम माझा ताठ व्हायला लागला ! ही कला हा कोठें शिकला एवढी ?

दुस०–अहो, ज्याच्या अंतःकरणांत यशवंताचें यश प्रविष्ट झालें, त्याच्या पुढें सर्व कला हात जोडून दासी सारख्या उभ्या असतात ! पहा किती मंजूळ घंटारव यानें सूरू केला ! माझा प्रत्येक स्नायू हर्षानें या नादासरसा उडावयास लागला !

पहि०–गुलाम गवया सारखा, प्रथम ' आ आ आ ' करून गायला लागला तो. कसलें बरें पद हा म्हणत आहे ?

दुस०–(कान दिलासें करून ) काय ? "भवतारक नाम तयाचें गाऊं " वाः किती सुरख गोड गायलेंन हें यानें !

पहि०–लोकांना मौजच्या मौज भासवुन, उपदेश करणारी ही तऱ्हे तऱ्हेची मंडळी, या गांवांत आली आहेत काहो ? पहा, इकडे वाघ्या मुरळीनें सर्व लोकांना गर्क करून टाकलें आहे ! धन्य आहे हा गांव !

दुस०–अहो, आपल्या या गांवाचें भाग्य उदयाला आलें आहे. अहाहा ! धन्य धन्य ती माऊली, कीं जिच्या पोटीं हा यशवंत ' गुंडा ' जन्मला ! आणि धन्य आम्ही या गांवचे लोक !

पाहि०-अहो थांबा हीं चोखा मेळ्याचीं जोडपीं नाचताहेत हीं पाहून मग पुढें जाऊं.

दुस०-मला हें पाहवें, का तें पाहवें, असें झालें आहे! तो पहा तिकडून टिंगरीचा सूर कानांत घुसला. हे कबीर पंथी लोक असतात जातीचे मुसलमान, पण यांना आपल्या देवाचें भजन करतांना पाहून आश्चर्यानंद होतो. हे पहा गुरबाळ संतोष, पांगुळ आणि वासुदेव; एकच गोंधळ आहे बुवा! हा मिश्र आवाज कसा काय लागतो कानाला?

पाहि०-हें मिश्रण तर कर्ण रोग हरण करील. (मध्येंच) हाय हाय! पण हा दीन स्वर मात्र आपल्याच्यानें ऐकवत नाहीं बुवा! हृदय द्रवलें!

दुस०-ही आंधळ्याची माळका आली वाटतें! होय तीच ही! (आंधळ्याची माळका 'देवदाता' ह्मणत येते. त्यांस हे पैसा पैसा देतात. ते 'देव तुम्हांला बरकत देईल' असें म्हणुन 'यशवंतराव महाराजकी जय' म्हणतात).

दोन्हीगृहस्थ-(यशवंतराव महाराजकी जय ह्मणून) जिकडे तिकडे हल्लीं "यशवंतराव महाराजकी जय" चालला आहे.

पाहि०-ह्या पहा याचकांच्या झुंडी संतुष्ट होऊन चालल्या आहेत, तर कोणी संतुष्ट होण्या करतां जात आहेत! सगळ्यांचा माय बापच आहे जसा या गावांत! जो तो मोठ्या उत्सुकतेनें भेटायला चालला आहे. सर्वांत हरिदास लोकांची बरी पंढरी पिकली आहे!

दुस०-ते घोड्यावरून बसून येत असलेले गृहस्थ, बहुतकरून हरिदास असावेत. गांवांत किती तरी हरिदास जमला आहे, पण तितक्यांचा परामर्ष महाराज घेत आहेत! जगत्कुटुंबी खरा!

पाहि०-अहो नुसते हरिदासच काय, पण तुम्हीच पाहताना, गवई, बजवई, नाटकवाले, तमासगीर, जसें एकादें राजधानीचें शहर बनून गेलें आहे, अहाहा! इतकें दातृत्व राजाच्या ठिकाणीं सुद्धां नसेल. अंमळनेर पंढरींतला पंढरिनाथच हा!

दुस०-एका महाराजांच्या सहवासानें सर्व गांव भाविक झाले.

पहा किती मन लावून हे लोक रांगोळ्या काढताहेत ! कांहीं पाण्यानें रस्ते भिजवीत चालले आहेत. किती शीतल हे पालवीचे मंडप ! प्रत्यक्ष राजाकरतां सुद्धां लोक इतकी मेहनत घेणार नाहींत ! मन अगदीं गार झालें ! पण ह्या सर्व आनंदांत लवकरच व्यत्यय येणार, कारण महाराजांची एरंडोलास बदली झाली.

**पहि०**–ही झुंड कसली येत आहे इकडून ?

( इतक्यांत ' यशवंतराव महाराजकी जय ' असा गजर होतो तिसरा गृहस्थ पुढें येतो तो गुळ शेरणी वाटतो. )

**दोन्हीं०**–कशाबद्दल ही महाराज ?

**तिस०**–तुम्ही आपलें तोंड गोड करा. तसेंच आमचें कांहीं काम घडून आलें त्याबदलचें आहें हें. बोला यशववंतराव महाराजकी जय ( एकच गजर होतो मंडळीची झुंड येते. ) ही आलीच वाटतें महाराजांची स्वारी. देवदर्शनाला चालली आहे. चला आपणही यांच्या बरोबरच देवदर्शनास जावें ( सर्व जातात व पुन्हां येतात. देवळाचा देखावा, जत्रेसारखा ह्मणजे फूलमाळी ' फुलें, हार, गजरे तुलसी घ्या ' म्हणतात. तसेंच मेवा मिठाइचीं दुकानें, गुलाल, बुक्का वगैरेचीं दुकानें व फेरीवाले, दृष्टीस पडतात. ' यशवंतराव महाराजकी जय असा मधून गजर होतो. याचक जनांच्या आरोळ्या ' अरे गरिबाला दे रे मायबाप ' अशा होतात. महाराज देवालयांत दोन तीन बड्या व इतर मंडळीसह प्रवेश करतात, देवा जवळ पुजारी उभा आहे, बाहेर महाराजांच्या दोन्ही बाजूला ब्राह्मण रांगेनें उभे राहून ईश्वर प्रार्थना म्हणत आहेत ती संपल्यावर महाराज जावयास निघतात, काहीं भाविक पाया पडतात, गुळाच्या शेरण्यांचे नवस फेडतात. महाराज ' सर्वत्रांना प्रसाद द्या ' असें सांगतात, कोणी द्रव्य देतात, त्यास ' गुरीब गरीबांना द्या ' धर्मा-कडे लावा ' असें महाराज सांगतात, याचकांस ' घ्या बरें ' म्हणून पैसे देतात, कोणी पाया पडून माझा मनोदय कशानें सिद्ध होईल म्हणून विचारतात, त्यांस कोणास एकादशणी करा, कोणांस सांज-वात लावा, स्त्रियांस-मारुतीस प्रदक्षिणा घाला म्हणून सांगतात.

या प्रमाणें देखावा दिसून 'यशवंतराय महाराजकी जय' अशी गर्जना होऊन पडदा पडतो.)

प्रवेश पहिला समाप्त.

---

## प्रवेश २ रा.

(स्थळ—एरंडोल. गांवा बाहेरील जागा, गोसाव्यांचा मेळा येतो.)

(निरंजनगुरु, रामपुरी आणि गंगापुरी बोलत येतात.)

**निरंजनगुरु**-जशवंतराय कहते हैं दाता हैं. (दाढीवर हात फिरवून ऐटीनें) अरे कायका दाता हैं, तो आभी देखते हैं. कहांतक दातृत्त्व उसका; जबतक हमारे जैसे तपस्वीकी मुलाकात न हुई तबतक. हमारे तपस्याके तेजनें कैसी उस्को शरम आती हैं वो देख पडेगी. उस्की क्या मजाल है हमारे सरीके तेजस्वी तपस्वीके साम्नें दाता होके ठैरनेकी ! हमे देनेको वो क्या समर्थ हैं ! कैसा साधो ?

**रामपुरी**—यथार्थ हैं. स्वामीजीकी तपस्या बहुत बडी है. सूरजके साम्ने खद्योतका तेज कैसा पडेगा ? स्वामीजीको देखकर, जैसा मट्टीका ढेला पानीमें घुलता है, ऐसी उस्की हालत होगी, उस्में कुछ शक नहीं.

**गंगापुरी**—महाराजकी तपश्चर्याही बडी है. सब हिंदुस्थानमें ऐसी तपश्चर्या कहींभी नजर नहिं आती. अजोध्या, मथुरा, कासी, ब्रिंदाबन, नासक, हरद्वारमेंभी, कोई आपका हमसर नहीं मिला. सबोंकी गुरुरी हरण हुई. तो ये मशककी क्या हकीकत है ? परपंची लोगोंका बडी मेहनत करके, योग साधन करनेवाले साधूके साम्ने कैसा तेज पडेगा ? (मिशावर हात फिरवतो.)

**निरं०**-(हातांतील दंड जमिनीवर जोरानें टेंकून) जय शंकर, एक पांवपर खडा रहके बारा बरस, फेर आंवधा लटककर बारा बरस बगैर खाने पिनेके फक्त धुम्रपान करके तपश्चर्या कियी है. और त्र्यंबकराज परसन किया है. सब देवनका देव—महादेव—मेरेको

प्रसन्न है; देखते हैं. अभी उस्का गर्व परिहार करेंगे, और शामको त्र्यंबकराजका दर्सन बडे आनंदमें करनेके लिये चले जाना मुकर्रर किया हैं. ( मोठ्यानें ) जय त्र्यंबकराज.

**चैतन्यपुरी**–( पुढें येऊन ) बराबर. जस देनेवाला त्र्यंबकराजहिं हैं. ( मोठ्यानें ) बोलो, जय त्र्यंबकराज.

**सर्व गोसावी**–जय त्र्यंबकराज. ( अशी गर्जना करून चालूं लागतात. )

**निरं०**–चलो, अभी इतने मेरे चारसों आदमियोंको, उस्का बाबाभी पुरा पड सकनेवाला नहीं. (रस्त्यांतील एकास ) कहां जसवंतका घर है ? बोल जलदी. गडबडना मत. ( तो गृहस्थ बोटानें यशवंतरावांचें घर दाखवून चालता होतो. ) क्या गडबडते हैं लोक देखो ? आपको देखकर सब तरफ शोर हो रहा है, ऐसे डरनेवाले और सत्वहीन लोगोंका दाता ! उस्का तेज ऐसे लोगोंमें पडता है. ( पाहून ) क्यं साधो, यहि घर बताया नहीं वो गडबडाट अदमीनें ?

**राम०**–यहि स्वामीजी. देखोजी कवाड तो खूला है. बहोत याचक, याचना कर रहे हैं, वो देखो, जसवंत वहि होगा. खडा रहकर सबको दिलाता हैं. ( एकिकडे ) इनका तेज भारी मालूम होता हैं, जैसाके नारायन.

**निरं०**–( स्वगत ) इनके तेजने मेरी तपश्चर्या सब हरण कर लियी. आह, दिलमें बहुत डर मालुम होने लगा, तो क्या अभी पिछेहट करनेकी है कितनाभी नुकसान होवे सब तपश्चार्याभी डुब जावे तो फिकर नहीं. टक्कर लेना तो ऐसेके साथ लेना, मेरी तपश्चर्याभी कुछ कम नहीं, किसकी तपश्चर्या हटती है ये देखना चाहिये. त्र्यंबकराज मेरेको जय देएंगे. ( उघड मोठ्यानें ) पुकारो जजमानको अंदर चलाके.

**सर्व**–( आहाल्लक अशी गर्जना करतात, पडदा उघडतो, आंत महाराज, एक पांथस्थ बाई व एक ब्राह्मण दिसतात. )

**माहाराज०**–( बाई पितांबर देते तो न घेऊन ) मातोश्री, तो आपल्यालाचं दिलेला आहे, नेसायची आपल्याला अडचण पडते तरी याचा उपयोग करित जावा.

बाई–( आनंदानें ) आपण मला जेवणापुरता नेसायला दिलात, असें समजून तो मी परत देत होतें, देव आपल्याला उदंड आउक्ष देईल आणि अखंड लक्ष्मी देईल.

ब्राह्मण–( हात जोडून ) यजमानांचें कल्याण होईल, धन धान्य संपत्ती घरांत नांदेल, यश मिळेल. महाराज, मी कुटुंब-वत्सल अडचणींत आहें मोठया.

**महा०**–( कनवटीचे पांच रुपये देऊन ) श्री नरहरीचें चिंतन करा, ह्मणजे अचडणी भागतील बरें !

**ब्राह्मण**–कल्याणमस्तू ( बाई व ब्राह्मण जातात. )

**निरं०**–अरे दाता है क्या कोई ! कितने देरतक खडे करते ? दाता, सबोंका सिधा लाव, अभीके अभी, ह्यांके यहां.

**महा०**–( काळूस हाक मारतात काळू ‘ जी ’ म्हणून येतो ) या सर्व साधूंना शिधा देण्याची तजवीज कर. ( काळू जातो. )

**निरं०**–अरे दाता, भुखें हैं, सब साधु भुखें हैं. प्राण निकल चले ये भुकसे. बारा बज गये, आत्माको आहुती अभी यहि वख्त देना चाहिये. लाव जलदी भिच्छा.

**महा०**–( सौम्यतेनें ) मेहेरबानीसे जरा धीर धरो साधो, अभी सबोंकी कामना पूर्ण होती हैं.

**राम०**–( एकीकडे ) कितनी शांती हैं ये दाता की; मगर जैसे जैसे ये नरमीका वचन बोलता हैं, वैसे वैसे हमारे स्वामीजी, क्रोधाविष्ट हो रहे हैं.

**निरं०**–( यशवंतरावाच्या अंगावर दंड उगारून धाऊन ) अरे कामना पूर्ण करनेवाले–अहालक–भिच्छा लाव.

**महा०**–( न गडबडतां किंचीत् हंसून ) मिलेगी, मिलेगी, जरा मेहेरबानी करके धीर धरो साधो.

**निरं०**–लाव अभी ( काळू येतो सर्वांस सिधा देतो तो सर्व घेतात निरंजन गुरु ‘ जयशंकर ’ ह्मणून उडी मारतो व भिक्षा घेत नाहीं ) अभी लेता नहीं, इतने देरकरके–हम साधुक सतानेवाले आदमी है तुम. तुम्हारा कभी भला नहिं हो जायगा. मेरे भुखी

आत्माको जला दिया. तुमारा घरदार और सब सता नाश हो जायगा. ( महाराजांच्या अंगावर धावतो. )

महा०–( त्याचा हात धरून ) माफ करो साधो, आप बहोत भुखी हैं, आपको बहोत तकलीफ हुई चलो महाराजजी, भोजन तयार है, स्नान करके–

निरं०–( रागानें ओरडून ) अरे अस्नान नहिं करते हम. ( महाराज त्याचा हात धरून त्यास घेऊन जातात. )

प्रवेश दुसरा समाप्त.

---

## प्रवेश ३ रा.

( स्थल–एरंडोल, महाराजांच्या बिऱ्हाडाची ओसरी. दोन आश्रित म्हणजे हरिदास व पुराणीक बोलत आहेत असा पडदा उघडतो. । )

**हरिदास**–किती लोक दुष्ट असतात या जगांत जे आहे त्ते. अशा पुण्य पुरुषाच्या विरुद्ध खटपट करण्याची यांना बुद्धि तरि कशी होते ? देव यांना बुद्धि अशी देतोच कशी याचें मला मोठें नवल वाटतें. अशा पुरुषाला संकटांत पाहून कोणाला बरें बरें वाटेल?

**पुराणिक**–कांहीं कां असेना ! ( हंसत ) तुमचे ग्रह फार सुरेख आले आहेत. हल्लीं अकरावा गुरु असावा बहुतेक आपल्याला ! रात्रीं जरा कधीं " आ-ऊ " केलें किं, झालें. आपलें तर यथास्थित चाललें आहेना ? त्यांच्यावर संकट आले तरि जे आहेत्ते आपल्या तरतुदींत कांहीं कमी होते आहे कां ! अहो जे आहेत्ते सूर्याला राहुनें थोडेंसें ग्रासलें म्हणून काय झालें ? तेवढ्यानें त्याला कमीपणा येत नाहीं आणि लोकांना जेआहेत्ते मिळणाऱ्या प्रकाशांतहि त्या योगाने कमीपणा येत नाहीं.

**हरि०**–( मनांत ) किती ढोंगी आहे हा मनुष्य ! केळींचें पान लागते जेवायला रोज ! घरीं याच्या काकोबानें ठेवले असतील, एवढ याचे थाटमाट ! किती निर्लज्ज ! दुसऱ्याचें मर्म भेदायला जे

आहेत्ते, याला लाज कशी वाटत नाहीं ? शिवाय ह्मणतो सूर्याला राहुनें ग्रासलें म्हणून काय झालें ! जे आहेते या लेकाला त्याचें कांहींच वाटत नाहीं. पण काय करायचें आहे आपल्याला ! जाऊं द्या. असल्या मूर्खाशीं जे आहेत्ते जेवढयास तेवढेंच असावें हें बरे. ( उघड ) सूर्याला जेआहेत्ते ग्रहण लागलें तर लोकांनां बरें वाटत नाहीं. यावर काय आपलें म्हणणें आहे ?

**पुरा०**–म्हणणें काय असायचें बोडकें ! जे आहेत्ते दान धर्म जप जाप करून अशा वेळीं हित चिंतन करित असावें. परंतु जे आहेत्ते निष्ठा असली म्हणजे झालें. मग हे जप जाप पोकळ बंडे हीं, हीं हवीत कशाला ?

**हारि०**–जेआहेत्ते, तीं ढोंगे केल्या शिवाय पोट नाहींना भरत ? महाढोंगी होत चालले लोक !

**पुरा०**–जे आहेते, परम हंस दृष्टिला ढोंग दिसतच नाहीं. जे आहेत्ते सर्वत्र एक ब्रह्म भरलेलें आहे.

**हारि०**–बोललो तर जे आहेत्ते आतां राग येईल । परमहंस दृष्टि जे आहेत्ते माझी बायको, माझें घर, माझा बिछाना, माझे धोंडे माझे दगड असें ह्मणत नाहीं. परोपकारी जे आहेत्ते देह खर्चावा लागतो. आपण जप करितच नाहीं वाटते ? ( गोविंद भडजी येतात त्यास पाहून )या गोविंद भडजी. कशी काय खबर? कांहीं जास्त कमी ? आपण महाराजांचे पुजारी, तेव्हां आपल्याला माहिती असायचीच.

**गोविंदभट्ट०**–खबर कसली ? कांहीं चांगली खबर नाहीं. उद्यां गाशा काढावा लागणार बऱ्याच मंडळीला येथून !

**पुरा०**–कां हो ? ( हरिदासाकडे वळून ) मीं तुह्मांला म्हटलें नव्हतें मघां ? ( गोविंद भडजीस ) का थट्टाच ? कांहीं जास्त कमी बेत झाले वाटतें ? ( माधवराव देशपांडे हातांत किर्द घेऊन येतो )

**माध्र०**–गोविंद भडजी आज ब्राह्मणांना दक्षणा किती लागली?

गोविं०–आज कांहीं फार नाहीं. अगदीं थोडी. चार रुपयांच्या पावल्या एकादशणीकडे सात रुपयांच्या चवल्या, पावल्या इतर वैदिक भिक्षुकांकडे बारा रुपयांचा खुर्दा दक्षणा, शिवाय बैरागी लोकांना मीच तुम्हीं देऊन ठेवलेल्या ह्या दक्षणेच्या पैशांतून गांजा तमाखु करतां खुर्दा वाटला तोच आज जास्त झाला, साडेसाहा रुपयांचा जवळ जवळ लागला तो. भारी गांजा पिणारे जबरे लोक! गांजाला द्या ह्मणून धडधडीत मागतात.

हरि०–आहो या व्यसनी लोकांना कवडी सुद्धां देऊं नये जे आहेत्ते.

पुरा०–( एकिकडे ) जे आहेत्ते यांना मात्र द्या.

माध०–बरें आहे, या प्रमाणें मी मांडतो माझ्या किर्दींत, आजच्या नांवेच्या बाजूचा बराच मोठा आकडा आहे. ( वाचित) कापड चोपड नुसतें पन्नास रुपयांचें. पण तें उधार खात्यांत आहे ज्वारी, बाजरी, तांदूळ, डाळ, आटा, हीं पण आजची उधारीच आहे. हे तेवीस ( मोजीत असलेसें करून ) तेवीस-तेवीस, आणि ते आठ रुपये–लाकडांच्या गंडोऱ्यांला, बैरागी लोकां करतां दिले ते आणि हे आत्ताचे, करू तो आतां हिशेब मग. एकंदर किरकोळ सुद्धां. बरें तें असो गोविंद भटजी, उद्यांची मिसल लाउंद्या. उद्यां तुम्ही पूजा करायची. आाणि फक्त तुमचीच तेवढी एकादशणी, महाराज घोघोहून येत तों पर्यंत.

हरि०–( पुराणिकास हळूच ) उद्यां घोघोस जाण्याचा बेत झाला आहे महाराजांचा. जे आहेत्ते आपल्याला सकाळीं गाशा गुंडाळावा लागणार !

पुरा०–जे आहेत्ते शेवटला पुख्खा उद्यां महाराजां बरोबर झोडून, निघणार आपण. ( उघड माधवरावास ) महाराजावर कांहीं संकट आलें असावेंसें वाटतें !

माधव०–होय. गांव आहे तेथें शास्त्री बोवा, माहारवाडा आहेच, कांहीं दुष्ट लोकानीं महाराजां विरुद्ध, सरकारांत अर्ज केले कीं, “देव भक्तींत, आल्या गेल्या ब्राह्मण वगैरे याचक समुदायास

दान धर्म करण्याचे कामीं व त्यांच्या तरतुदीच्या खटपटींत, मामलेदार यांचा सारा वेळ मोडत असल्या मुळें, व तसाच सर्व लोकांवर दया करण्याचा ह्यांचा स्वभाव असल्यामुळें, ह्यांस सरकारी काम करण्यास, पाहिजे तसा वेळ न सांपडून, महत्वाचीं कामें दिरंगाईवर तुंबून राहून, लोकांस वक्तशीर न्याय मिळत नाहीं. शिवाय त्यांस तालुक्यांत कायद्याविरुद्ध लोकांचे कर्जहि पुष्कळ झालें आहे." वगैरे दुष्टांनीं, नाहीं नाहीं ते उपाय केले. चौकशा सरकार मार्फत झाल्या. पण त्या नृसिंहाला काळजी. पेठ पारोळें, येथील सावकार लोकांनीं चौकशींत स्पष्ट जबाब दिले कीं, "आम्ही मामलेदार यास कर्जाऊ पैसा, केवळ आमच्या खुशीने दिला आहे. त्याचा व्यय मामलेदार यांजकडून धर्म कृत्यांकडे झाला आहे, ह्मणून आमचा तो पैसा, त्याज कडून परत होई पर्यंत, तो आमचाच धर्म झाला, असें अम्ही समजतों. पुढें कदाचित् तो पैसा आमचा आम्हांस त्यां कडून परत आला, तर मग तो धर्म त्यांचा झाला, असें आम्ही समजूं."

**गोविं॰**–ह्याच गोष्टी महाराजांना नोकरी विषयीं वैराग्य येऊन राजिनामा देण्याला कारण झाल्या.

**हरि॰**–( हळूच ) राजिनामा दिलातर !

**पुरा॰**–( हळूच ) आतां राहण्यांत अर्थ नाहीं. ( उघड ) मग आतां पुढें ?

**माध॰**–परंतु काल दोन चांगल्या गृहस्थांनीं सुचवल्यावरून महाराजांनीं एलिस साहेब बहादुर, रेव्हिन्यू कमिशनर उत्तर प्रांत, यांचे हुजूर एक इंग्रेजींत अर्ज लिहून लागलीच रवाना केला; त्यांतील आशय हाच कीं "माझ्या मनास तशीच कांहीं उद्विग्नता प्राप्त झाल्यामुळें, मी जिल्हयास राजिनामा देऊन चुकलों. परंतु आपण प्रापंचिक, तेव्हां आपल्या हातून ही गोष्ट बरोबर घडली नाहीं, असें मागाहून विचारा अंतीं ध्यानांत येऊन, खेद वाटत आहे. आतां जिल्हयाकडून सदर्हु राजिनाम्याचें प्रकर्ण, आपल्याकडे येईलच, परंतु या संबंधानें हुजुरास माझी खरी स्थिती जाहिर

करण्या करितां, मी समक्ष लवकरच निघून येण्याचें करित आहें. करतां तेथ पर्यंत हा राजिनामा मंजूर न होण्या विषयीं, ही माझी विनंती आहे " इतका खुलासेवार मजकूर त्यांत आहे. शिवाय याच आशयाचें एक खासगी पत्र मे० म्यान्सफिल्ड साहेब बाहादूर, सिंधचे कमिशनर, यांजकडे पाठवलें आहे. या प्रमाणें तजविजा केल्या आहेत; आतां श्रीनृसिंह काय करिल तें खरें !

गोविं०—त्याला काळजी आहेच. आपल्या मनुष्याच्या काळजीनें काय होणार ? हा महाराजावर आलेला प्रसंग ऐकून, पुष्कळ लोकांना वाईट वाटून, कालपासून मंडळी भेटायला बरीच येत आहे.

पुरा०—( हरदासास हळूच ) उपयोग काय ? जे आहेत्ते आपल्याला काटशह काढलाच पाहिजे.

हरि०—( हळूच ) ऐका हो, सगळें ऐकून तर घ्या, तुम्ही जे आहेत्ते खाबुनंदनच दिसतां,

माधव०—सकाळीं पारोळकर सावकार मंडळी आली होती त्यांनीं " आपल्या मागें आपल्या सर्व कुटुंबाची व आपल्या चालत आलेल्या नित्यक्रमाची सर्व प्रकारें, बेबुदी राखूं; आपण कोणतिही फिकीर ठेऊं नये, यश मिळवून पुन्हां आपण आपल्या कामावर लवकरच दाखल व्हाल असें देव करील " असें आश्वासन दिलें आहे, हा एक शुभ शकुनच म्हणायचा, कोण अशा संकटांत इतक्या प्रकारानें उपयोगी पडणार हो! पण तो देवच त्यांना बुद्धि देतो,

हरि०—<br>पुरा०— } ( आवेशानें )—यांत काय संशय ?

हरि०—<br>गोविं०— } आहे अजून आशा आहे जेआहेत्ते.

पुरा०—( हळूच ) माझ्या छातींत चढलेला धोंडा जेआहेत्ते, थोडथोडा खालीं उतरायला लागला.

गोविं०—( मनांत ) परान्न पुष्ट या दोघाना म्हणेन तर मीहि तसाच आहे लठ्ठभारती. ( उघड ) निघण्याची तयारी बांधाबांध झालेली

आहे. बरोबर कोण दोघे बंधू वासुदेवराव, बाळिराम दादा, काळू शिपाई आणि ब्राह्मण असेल शिवाय ?

**माध०**—होय, गर्गाचार्यांच्या मुहुर्तानें उद्यां पहांटेस जायला निघणार आणि चाळिस गांवाहून पुढें मुंबईस जाणार आगगाडिनें तेथें कोणी आप्पा वाळवेकर म्हणून लिंगाईत व्यापारी आहे, त्याच्याकडे उतरणार आणि मग बोटिनें पुढें जाणार, वळणाचें पत्र घेतले आहे वाळवेकराच्या चांगला आहे म्हणतात तो सज्जन.

**गोविं०**—( ऐकलेसें करून माधवरावास ) तिकडे महाराज कशाला हाक मारताहेत पहा तुम्हाला ?

**माध०**—काय ? ( गडबडीने जातो, पडदा पडतो. )

( महाराजांची निजायची खोली, महाराज व माधवराव बोलत आहेत असा पडदा उघडतो. )

**महा०**—या प्रमाणें व्यवस्था ठेवायची, आलेना लक्ष्यांत ? तुम्हाला सांगायला नकोच.

**माध०**—सांगितल्या प्रमाणें सर्व करतों, कांहीं काळजी करू नाहीं महाराजांनीं.

**महा०**—बरें तर, जा तुम्ही निजायला दमले असाल. तुम्हांला आत्तांशी भारी काम पडतें माधवराव ?

**माध०**—( जातां जातां आपल्याशीं) अहाहा किती दयाळु धनी हा ! अशाची सेवा कितीही करावी लागली तरी श्रमाचा भास सुद्धा होणार नाहीं. निर्मल अंतः करणापासून निघालेल्या गोड शब्दांनीं तेव्हांच मन हरखून जातें. आतां झोप मला किती गोड लागेल ! ( जातो )

( सुंदरा बाई प्रवेश करतात. )

**महा०**—( सुंदराबाईस आपल्या हातानें पलंगावर बसवून ) प्रिये, तुझें मुखकमल रोजच्या सारखें दिसत नाहीं अशी उदास कां बरें झालीस आज ? आल्याबरोबर प्रसन्न मुखानें माझ्याकडे पहायचें, आणि मला हंसवायचें ते विसरलीस वाटतें ?

सुंदरा०-जसं कांहीं, इकडे माहितच नाहीं वाटतं उदास पणाचं कारण ? माझ्याशीं हा असा स्वभाव आहे हें कुणाला तरि माहित असेल कां ! पुरषांना काय मेलं कसलं मोठं संकट येईना त्याचं कांहींच वाटत नाहीं. पण बायकांना कसं होत असेल अशा-वेळीं, हें नंकोकां समजयाला पुरषांना ? राजीनामा देण्याची बुद्धि कुठून आठवली बाई,-आणि त्यापाई आतां ह्या लांबलांबच्या खेपा-हे पाय मी अंतरु द्यायची नाहीं.

यशवंत०-( हंसून ) अगदीं वेडी आहेस तूं, शहाणी शहाणी समजत होतो ती ! दोन दिवस कामा करतां तिकडे जायचें आहे, कां हौशिनें जायचें बरें यात्रेला? साहेबांची भेट होऊन काम झालें कि, लागलीच परतायचें.

सुंदरा०-पण मला किनई बरोबर न्यायचं व्हावं गडे ! मी कांहीं नुस्त्या गोड गोड भाषणानं ऐकायची नाहीं. हें काय मेलं हें, सगळ्यांची दया येते आणि माझीच कशी नाहीं बाई ! मी कांहीं बरोबर आल्या शिवाय रहायची नाहीं हो, मी आपली बांधाधांध करून ठेवली आहे !

यशवंत०-अगदीं वेडी खरी. ( तिच्यागळ्यांत हात घालून ) तुझी दया मला येत नाहीं ? तू मला जड का होणार आहेस बरोबर. तुझ्या योगानें तर हा प्रवास मला जास्त सुखाचा होईल. पण तुझे सासु, सासरे आहेतना इथें? त्यांची सेवा नको कां तुला करायला ! त्यांना वाईट वाटेल असें तूं कधीं केलें आहेसकां ?

सुंदरा०-( हंसत ) मग त्यांना घेऊन चलावं गडे ! नाहीं तर आपणच जाऊं नये ! कुठून तरि आडवायचें कसं अगदीं कि, मेली बोलायला जागाच राहूं नये !

महा०-बरें आहे तर! नको जाऊं मी ? नको नोकरी ? सांगत असलीस तर- मला नोकरीचा मना पासून विट आला आहे, मोकळा तरि होईन. तुझी तयारि आहेना ? त्या वृद्धांची काळजी वाटते. पण दादा आहेतच. ते कांहीं त्यांचें कमी पडूं देणार नाहींत. आतां लोकांना जरा वाईट वाटणार आहे, पण त्यांची समजूत करतां येईल.

सुंदरा०–आपली वाट ती माझी वाट ! पण बाई नोकरीचा कां एवढा विट आला आहे ? नोकरि मुळें सुख आहे हो. नोकरीचं वैभव आणिक असतं ! मग कशी सांगू बाई नोकरी नको म्हणून ! मी काढीन हो दिवस आपण येस तों पर्यंत ! पण अझून पर्यंत हे पाय अंतरले नव्हते; म्हणून जरा वाटतं–( गहिंवरून महाराजांच्या गळ्याला मिठी मारते. )

महा०–( तिचे डोळे पुसून ) तूं समजूतदार आहेस; अग, या संसारांत मानून घेतलें तर सुख आहे. कधीं सुखाचे दिवस, कधीं दुःखाचे. देवांना सुद्धां हें चुकलें नाहीं, मग आपण तर यःकश्चित मनुष्य.–

सुंदरा०–हो; सितेच्या, द्रौपदीच्या गोष्टी अशाच पुराणांत आहेत. त्या तर देव होत्या; त्यांनीं जर दुःखं सोसलीं, तर मी काय मनुष्यच ? पण बाई जपून जायचं. फराळाचं बरोबर देईन म्हटलं तर ते गाडीच्या विटाळाचं चालत नाहीं, बाकी भाऊजी आहेतच बरोबर; तेव्हां तितकी काळजी कमी वाटते. तिथं उतरण्या सवरण्याच्या तरि सोई आहेत कां नीट? चाळिसगांवला आगागाडींत बसून मुंबईला जायचे; आणि मग पुढें ते गांव घोघो कां काय, तें किती लांब ?

महा०–जवळ आहे तेथून. बोटींत बसून पुढें जायचं. कांहीं काळजी करूं नकोस. श्रीनरहरी आहे आपला कैवारी.

सुंद०–अगबाई, पुढं बोटीचा का प्रवास आहे ? मीं म्हटलं जवळ कुठं असेल मुंबइच्या, मेली कांहीं तरि गरज इतक्या लांब जायची ! दुष्ट दुष्ट बाई लोक ! एकाद्याच्या चाहाड्या सांगून कसं वाईट करावंसं वाटतं ! कद्धीं कल्याण होणार नाहीं मेल्यांचं !

महा०–छे, छे, अग असें भलतेंच काय बोलतेस ! त्यांनीं काय दुष्ट पणा केला ? आपलें कर्मच तसें ! त्यांना वाईट बोलून आपली जीभ कां विटाळतेस ? आपलें प्रारब्ध जर चांगलें असतें तर त्यानां ही दुष्ट वासनाच झाली नसती !

सुंद०–किती बाई भोळे पणा हा ! कोणाची निंदा आवडत

नाहीं, स्तुति आवडत नाहीं, कित्ती कोणी नुकसान करा, इकडं त्याचं कांहीं नाहीं. कोणी शिव्या दिल्या, नासकं कुचकं बोललं, काम ऐकलं नाहीं, घरांतल्या वस्ता चोरून नेल्या, तरी आपलं ज्याचं नांव तें ! एक शब्दानं तरि त्याला नुसतं दटावायचं. मुळीं रागावणं जसं कांहीं माहितच नाहीं ! बाहेर रागावायचें होत असेल तर मला कांहीं माहित नाहीं, पण घरांत तर मी अजून पर्यंत पाहिलं नाहीं, लग्न झाल्या पासून इतके दिवस झाले तरि !

**महा०**–अग, राग हा मांग आहे. त्याला शिऊं नये !

**सुंद०**–तसंच आतां बोललें तर इकडे राग येईल ! ( हंसून ) अगबाई, राग येत नाहीं म्हणून आत्तांच ना मीं ह्मणालें, आणि पुन्हां काय हें माझ्या तोंडांतून आलं राग येईल म्हणून ! हे मेले सगळे घरांत पडून राहिलेले सोळ भोक, म्हटलं, येतिल कां कांहीं आतां कामाला ? त्यांना अगदीं पोटच्या पोरासारखें वागवायचं तें ! जरा कोणी त्यांना लागेल, असे बोलतां सुद्धां उपयोगी नाहीं ! वेळेला आतां उपयोगी पडेल भलतेच !

**महा०**–अग, त्यांच्या नशिबानें ते खात आहेत, आपण काय इथें घेऊन आलों आहों बरं ? त्यांच्याच नशिबाच्या जोरावर, दुसऱ्याला आपल्या उपयोगी पडण्याची वासना होते. हेच कोणी आपले भाऊ किंवा दुसरे कोणी आप्त असते तर त्यांस आपण टाकले असते ! ना इलाजास्तव ते राहतात आपल्या इथें, असें समजलें, पाहिजे आपण !

**सुंद०**–नाइलाज ! झालं आहे काय ? धट्ट कट्टे चांगले हात पाय देवानं दिले असून !

**महा०**–अग, हीच ती तुझी कोती समजूत ! त्यांच्या दैवींच तसें सुख आहे, असें समजावें ! त्याच्या बद्दल चांगलें वाटावें तर उलट वाईट कां वाटुन घेतेंस ! आपलें काय ते घेत आहेत ! त्यांचें तेच घेत आहेत ! अग, हा संसार म्हणजे एक खेळ आहे. यांत चार दिवस खेळून जायचें आहे ! त्यांत वाईट आणि बरें काय वाटायचें ! मौजेनें खेळायचें यांत. ( तिच्या हनुवटीस हात

लावून ) मी सांगतों हें खोटें आहे का ? पहा बरें विचार करून ! तुझ्यावरहि श्रीनृसिंहाची कृपा कांहीं कमी नाहीं. ( तिचें चुंबन घेतो. )

**सुंद०**–मी कुठें म्हणतें आहे, माझ्यावर नृसिंहाची कृपा कमी आहे म्हणून ! आपली कृपा आहे हीच नृसिंहाची कृपा. ( हंसते. )

**महा०**–( मनांत ) आतां गोष्ट काढायला बरी वेळ आहे. ( उघड ) प्रिये, तूं आनंदांत येण्याचीच मी वाट पाहत होतों. आतां तुझ्यापाशीं ती गोष्ट काढायला हरकत वाटत नाहीं; कारण तुह्मां स्त्रियांना दागिने ह्मणजे जिवा पेक्षां जास्त आवडतात. पण भावलाभावलीच्या अंगावरच्या दागिन्याच्या इतकेंच त्यांचें महत्व. पण मला नाहीं वाटत, तूं इतर स्त्रियां प्रमाणें हट्ट धरशील असें. तुला इतकें सांगितलें तें फुकटच कां गेलें असेल ? अग हा खेळ आहे. आपले दागिने कोणी उचलून नेले, ह्मणून कोणाला आपलें नशिब तर नाहीं उचलून नेतां यायचें !

**सुंद०**–( रागानें ) हो, पुरे झाल्या त्या नशिबाच्या गोष्टी ! मला बाई फारच राग आला, आपण दागिन्यांचं नांव काढलं तेव्हां ! ही काय बाई बुद्धि आठवली आज ! आपल्या भोळे पणाच्या विचारण्यानें, माझा रागच मेला कुठं नाहींसा होतो म्हणून ! नाहीं तर दुसरं कोणी असतं, तर त्याला सांगितलं असतं काय तें !

**महा०**–मग काय बरें वेड्या सारखें असें करावें ! मी एरवीं मागेन कां ? तुझ्या अंगावर दागिने नसावेत म्हणून का हे केले ? आणि खरी शोभा दागिन्यांनी कां येते वेडे ! हीच का तुझी समजूत ! लोकांनीं आपल्या जवळ मागावें आणि आपण त्यांना द्यावें, हेंच खरें भूषण, हाच खरा दागिना. मला तर हा मनापासून आवडतो, मग तुला कोणता आवडत असेल तो पहा !

**सुंद०**–( मनांत ) म्हणणं कांहीं खोटं नाहीं इकडचं. आणि इकडच्या सहवासांत मला त्यांनीं म्हटलेलाच दागिना आवडून घेतला पाहिजे. पण एकदम काढून देण्याला तयार होऊं नये. पुन्हां मिळतील कि नाहीं याचं भय वाटतं ! पण मन दुखवण्याला सुद्धां

माझ्या जिवावर येतं, कारण एरवीं कोणी मागायचंच नाहीं दागिने ! दिले तर पाहिजेतच आतां, कारण फार ओढून धरलेलं अवडायचं नाहीं ! आणि फार कोणी अंगचटीसहि जाणार नाहीं. ( उघड ) कध्धीं बाई असा प्रसंग नाहीं. काय ही वेळ आणलीस देवा ! या हातानं कधीं असं काढणं झालं असेल, किंवा मी आपल्या हातांनीं कधीं काढून दिले असतील, तर ते काढवतीलना ?

महा०–अगदीं वाईट वाटूं देऊं नकोस. आनंदानें काढून दे, देवानें काहीं वाईट प्रसंग आणला नाहीं, चांगलाच आणला आहे. आपल्या अंगांतलें सत्व दिसून येतें अशा वेळीं. पुराणांतल्या चांगुणेच्या गोष्टी ऐकतेसना ! मग नुसते दागिने द्यायला तुला कठीण वाटतें !

सुंद०–बाई माझा कांहीं हात वाहत नाहीं, आपणच घ्या कसे ते काढून !

महा०–( तिच्या अंगावरील दागिने काढून ) तूं भिऊं नकोस, पुन्हां दागिने मिळणार नाहींत म्हणून ! वेळ आली कीं पुन्हां मिळतील, पुन्हां जातीलहि. त्या बद्दल खेदच करीत जाऊं नकोस. जसा प्रसंग पडेल तशा धैर्यानें वागत गेलीस, म्हणजे मला किती आनंद देशील ! ह्या वेळेस तूं मला फार आवडतेस. ( तिला पोटाशी धरतात. )

सुंद०–किती बाई निष्ठूरपणा हा. इतकं कठीण अंतःकरण असेल, असं नव्हतं वाटलं मला, नुसतं गोड गोड बोलायचं. आपल्या मनांत असेल तसं करायचं ! केलं तर करा, पण मेले हे दागिने आतां मोडून त्या मेल्या साहेबाबिहिवाला का द्यायला न्यायचे आहेत ? बरोबर नीट ठेवावे ! लांब एवढ्या जायचं, केव्हां काय होईल याचा नेम नाहीं, उपयोगी पडतील, नाहीं तर तसेच आणावेत. यांचें दुसरं नाहींना कांहीं करायचं, सांगातं गडे लवकर !

महा०–अग, साहेब पैसा घेत नाहींत देतात उलटा ! ह्या दागिन्यांचा उपयोग फार चांगल्या कार्याकडे होणार आहे. अग, ह्याचे पैसे गरिब आणि कुटुंबवत्सल लोकांच्या उपयोगीं पडणार आहेत. धन्य आहेस तूं !

सुंद०—अगबाई, इकडे कां आपण खर्चणार माझे दागिने ! आणि मला धन्य करणार ! जळ्ळी ती धन्यता ! नको बाई मला ती !

महा०—ती तुझ्या दैवींच लागली आहे. नको म्हणून कसें चालणार ! नृसिंहाची तुझ्यावर कृपा ती हीच.

सुंद०—करा काय मेलं हवं तें करा. आपण कांहीं केलं तरी होणार कधीं चुकत नसतं !

महा०—आतां कशी बरें माझी लाडकी बोलली ! आतां खरी शोभतेस मला तूं !

सुंद०—अशी भुंडी शोभते कां ? ( सुस्कारा टाकून ) आतां आपण तिकडं गेल्यावर मला दागिने तरि काय करायचे आहेत ? आई, जगदंबे, लवकर सुरक्षित परत येणें होईल असें कर, म्हणजे एकशेआठ दंपत्ये तुझ्या नांवानं सांगेन !

महा०—कांहीं काळजी करूं नकोस, त्या नृसिंहाला काळजी आहे. चल आतां दोन घटका स्वस्थ पडूं. कारण आतां पहांट होईल. ( पडदा पडतो )

प्रवेश ३ रा समाप्त

---

## प्रवेश ४ था

( स्थळ–गांव, पाटण. सतरा पाटलाचें घर. )

पात्रें–सतरा पाटील, इंद्रसिंग राऊळ, विनायकराव शारंगपाणी, धोंडु, झुगरू व इतर मंडळी बोलत आहेत. )

सतरा०—खोटें कशाला सांगूं महाराज ! खोटं सांगून मला कांहीं फायदा आहे कां ? आपल्या पदरचे पांचशे रुपये घालवून, मला काय यांत मिळायचं होतं, असें आपल्याला वाटतें ! खरें पुसाल तर माझी अडचणच होती, घरांतली अडचण बाजूला ठेऊन, अगदीं गळ घातली महाराजांनीं, म्हणून त्यांना मी तावड-तोब रुपये दिले. व्याज मी महाराजां पासून कधींच घेत नाहीं " चौधरी या समयीं नाहीं म्हणूं नका, हे मी तुमचे रुपये धुळ्याहून परत करीन, इतक्यावर तिथें सोय नच जमल्यास थेटहून पाठवीन"

इतके शब्द त्यांच्या मुखांतून निघाल्यावर माझ्यानें मुळीच आढे वेढे घेववले नाहींत. ( सुस्कारा टाकून ) आहाहा ! तो शिपाई माझ्या डोळ्या समोर दिसतो हो ! फुटक्या नशिबाचा मी, कीं त्याला नुसतें ‘ ये बैस ’ सुद्धां म्हटलें नाहीं.

इंद्रसिंग–नशिब पाहिजे पाटिल बोवा. त्या शिवाय व्यर्थ आहे. तुम्हांला नुस्तें दर्शन तरि झालें !

विनायकराव–पाटिल बोवा तुम्हांला खोदून विचारतो, याचा राग मानूं नका. मी मुद्दाम शिंदखेड्याहून तेवढ्या साठींच आलों आहे. अलिकडच्या लोकांचा असल्या गोष्टींवर विश्वास बसत नाहीं; ह्मणून प्रत्यक्ष जाऊन पहावें, ह्मणजे मंडळींची खात्री करण्यास ठीक पडेल, हा माझा येथें येण्याचा उद्देश. महाराज येथून गेल्यावर कितव्या दिवशीं बरें तो परदेशी येथें आला ?

सतरा–बरोबर सातवे दिवशीं. पहाटेस मी उठून नामस्मरणाला आरंभ करतो, इतक्यात–“ सतरा पटेल दार खोलो ” असें ह्मणाला, आणि दारावर थाप मारली.

इंद्रसिंग–पुढें ?

सतरा०–आंतून विचारलें मी, “ कोण आहे ” ह्मणून. तर “ आप दरवाज्या खोलकर बाहेर आव, फेर मै कोन हूं ये कहुंगा” असें म्हणाला. मी दरवाजा उघडून डोकावतो, तो “ आप सतरापटेल हो के दुसरे कोई हो ” असें त्यांनीं मला खडसून विचारलें.

विना०–मग त्याला तुम्हीं काय सांगितलं ?

सतरा०–मीच सतरा पाटिल, असें सांगितल्यावर, कुठून काय कामा करितां आला, म्हणून विचारणार, तोंच आपण म्हणतो, “ जसवंतराव महाराजनें, आपके पांचसो रुपिये पोहोंच्यानेंके वास्ते, आपके तरफ मेरेकु धुलियासे भेजा है. ये मोहरबंद थैली देखकर, खोलके पांचसो रुपीये आपके हाथसें मोज लिजीये. और रुपिये मिले बद्दल, पावती लिखके राखिये. जबतक मै भगवान चौधरिके घरसे जाके आता हूं ” तो अजून येत आहे, आणि मी पावती राखताय, ( हंसतात )

इंद्र०-मग भगवान चौधरीकडे लागलाच तपास केला कीं नाहीं?

सत०-येईल इतक्यांत, म्हणून चार घटका वाट पाहिली, आणि मग, भगवान चौधऱ्याकडे आहे कि नाहीं, पाहून ये तो शिपाई, म्हणून झुगरूला आमच्या पाठवलें!

विना०-( झुगरूकडे बोट दाखवून ) हाच तुमचा मुलगा झुगरू वाटते?

सतरा०-(मान हालवून) होय. त्याला विचारा हवीतर ती गम्मत.

झुगरु-भगवानकाकाला पुसतो, तर तो म्हणे कुठला शिपायी, कोण, माझ्याकडे सकाळपासून कोणी आलें नाहीं; मग सगळ्या गांवांत शोध केला तरिबी पत्ता नाहीं.

सतरा०-अहो संध्याकाळ पर्यंत मला आशा होती, म्हटलें कुठल्या जवळच्या गांवांत गेला असेल कामा निमाला, येईल संध्याकाळीं. पण जेव्हां रात्र पडली तेव्हां मात्र माझ्या मनांत निरनिराळे विचार यायला लागले, आणि हा गृहस्थ गेला तो पावती न्यायला अजून कसा आला नाहीं, म्हणून मला आश्चर्य वाटलें.

विना०-पण तो यायच्या अदल्या दिवशीं तुम्हांला काय वाटलें होतें?

सतरा०-खरेंच पुसाल तर मला तें सांगण्याची सुद्धां शरम वाटते. आदले दिवशीं म्यां गाढवानें महाराजांना शिव्या सुद्धां दिल्या मनांतल्या मनांत.

इंद्र०-कांहीं खेद करूं नका आतां. झालें तें झालें, होतेच आहे. "साहा दिवस झाले अजून कां रक्कम येत नाहीं धुळ्याहून येणार ती" असें मनांत येऊन, तसें तुमच्या कडून झालें असेल. त्यांत कांहीं नवल नाहीं मोठें. किती झालें तरि संसारी लोक आपण!

सतरा०-पण म्हणूनच देवाला संकट पडलें हो. सातव्या दिवसाची बोली. भक्ताची बोली खरी करण्या कारितां देवाला परदेशी व्हावें लागलें! शिव, शिव, धिक् माझें जिणें! देवाला माझ्या मुळें त्रास पडला, आणि त्रास पडून शेवटीं मी भर समुद्रांत कोरडा

राहिलो. माझ्या अंतःकरणाला अतिशय खातें हो खातें हे! (सुस्कारा टाकून) पुन्हां कसला तो आतां दृष्टिस पडतो? अहाहा! सतरा पटेल, सतरा पटेल, किती त्याची मधूर आणि गंभीर वाणी! सत्र्या फुकट जन्मलास रे सत्र्या.

**विना०**–(मनांत) याच्या मनाला ही गोष्ट खरोखर खात आहे. हा निव्वळ भाविकपणा तर खास नाहीं, असा नुसता शिपाई येऊन गेला, आणि तो पुन्हां दिसला नाहीं, ह्मणून कोणाला इतकें वाईट वाटणार नाहीं. तेव्हां खास त्या शिपायाच्या कृति मध्यें, बोलण्या-मध्यें दैवीच चमत्कार असला पाहिजे. तो दैवी चमत्कार अनुभवा शिवाय कळणार नाहीं. तो नास्तिकाला समजणें तर अगदींच अशक्य. सूर्य असा असा आहे, ह्मणून जन्मांधाला किती सांगितलें, तरि त्याची त्याला कशी कल्पना करतां यावी! दैवि-चमत्कार अमच्या हिंदुस्थानांत फार होतात. तसे इतर देशांत होत नाहींत. आणि तसल्या देशांतील लोकांच्या सहवासानें, आमचा आह्मांस विसर पडतो, आतां ही बातमी "खानदेश वैभव" मधून प्रसिद्ध केली पाहिजे.

**सतरा०**-आहाहा! देवा तुझें चरित्र अगाध आहे, तुझी लिला मनाला हरण करणारी आहे. दगडांत आणि हिऱ्यांत जितकें अंतर, बाभळींत आणि चंदनांत जितकें अंतर, पितळांत आणि सोन्यांत जितकें अंतर, काक शब्दांत, आणि कोकिळ शब्दांत, पण छे– ह्या उपमांनीं तुझें स्वरूप आणि तुझा तो स्वर, ह्या पैकीं, कांहीं एक कळण्या सारखें नाहीं. जसें त्यांत आणि तुझ्यांत मनस्वी अंतर, तसेंच माझ्यांत आणि तुझ्यांत देवा केलेंसना! तहानेंत आणि पाण्यांत जितकें अंतर तितकेंच देवा तुझ्यात आणि मझ्यांत अंतर! (सुस्कारा टाकतो.)

**इंद्र०**–(मनांत) अरेरे, ह्याच्या मनाला ही गोष्ट अतिशय डांचत आहे! तेव्हां कांहीं तरि येथें अनुभव आहे. पाण्याला खालीं उष्णता असल्या शिवाय उकळ्या फुटायच्याच नाहींत!

**विना०**–याची ही स्थिती पाहून मला बेदर बादशहाच्या गोष्टिची

आठवण होते. आतां तो प्रत्यक्ष बादशाहा विष्णुचा अंश होता. हा यःकश्चित पाटिल आहे. ( उघड ) बेदरच्या बादशाहाची गोष्ट, पाटिल बोवा, आपल्याला ऐकून ठाऊकच असेल ! तशीच स्थिति आपली होत चालली आहे.

सत०–तो बादशहा. मी यःकश्चित पाटिल. माझी त्याची कसली बरोबरी करता ? देवानें आपलें वचन राखलेन् नी मला वेड लावून गेला झालें. आतां हा देह त्यालाच अर्पण केला. महाराजांच्या पायांवर मी आपल्याला वाहून घेणार ! हे रुपये आणि त्यांच्या कडून आलेला शंभर रुपयांचा माल गुळ, तांदूळ, सारें त्यांचें त्यानाच परत देणार. हा ( तिरस्कारानें ) संसार नको वीट आला ह्याचा. धोंडु, झुगरु आतां झाले आहेत मोठे. त्यांचें त्यांना समजायला लागलें आहे. आतां हरि हरि म्हणत, स्वस्थ–आहाहा! (हरि हरि म्हणतो ) किती गोड लागतें देवा तुझें नांव ! आतां मुळींच तुझ्या नांवाचा मला कंटाळा यायचा नाहीं. आहाहा, तुझ्या त्या मूर्तीला नेहमीं हाक मारावेंसे वाटतें ( हरि हरि म्हणतो. )

विना०–
इंद्र०– } ओहोहो, वैराग्याचा हा पूर्ण झटका आहे.

धोंडू–आत्तांशीं दोन तीन दिवस त्यांचें असेंच चाललें आहे. मी सटाण्याहून महाराजांस पोचवून आलों तेंव्हांच वृत्ति पालटलेली दिसली मला. कधीं कधीं तर “ सतरा पटेल सतरा पटेल ” असें आपण आपल्यालाच हाका मारित असतात हळू हळू.

इंद्र०–सटाण्यास आपली घरची गाडी नेली होती तुम्ही महाराजांना ?

विना०–आणि तेथें महाराजांना पैसे मिळालें नाहींत ?

धोंडू०–होय. वळणा शिवाय, कोण देणार ! महाराजांनीं पुष्कळ यत्न करून पाहिला पण नाहीं. शेवटीं शंभर रुपयांचा, आपल्या नांवावर उधार माल घेऊन तशी शंभरांची भरती दिली. आणि शेवटीं महाराज म्हणाले, चुलत्याला म्हणावें “ बोली प्रमाणें पैसे दिले नाहींत. राग करूं नये. लवकर फेड करतो, माझा त्रास करूं नये. ” ते त्यांचे शब्द ऐकून मला गहिंवरच आला. मी

सांगितलें काकांची समजूत करतो आपण कष्टि होऊं नये. बोली टळली त्यांत आपल्याकडे कांहीं दोष नाहीं. रुपये काय फिटून जातील.

**सत०**–( धोंडूस ) शाबास, शाबास, धोंडू तूं धन्य आहेस. महापातकी चांडाळ मीच. ( हरि हरि म्हणतो. )

**धोंडू०**–इथं येऊन बघतो तर हा प्रकार ! ( किर्द दाखवून ) हे पहा त्या भित्तीला रुपये जमा आहेत.

**विना०**– }
**इंद्र०**– } धन्य अहा यशवंतराव महाराराज धन्य अहा.

**इंद्र०**–ज्याचा कैवारि देव. त्याला काय हो ! किती अडचणी आल्या म्हणून काय होणार त्यांचें वाकडे ?

**विना०**–यांत काय संशय ? नोकरिला नालायक म्हणून काहीं दुष्टांनीं अर्ज केले, राजिनामाहि यांनीं इकडून दिला, पण शेवटीं मिळालीच नोकरी. खुद्द ऐलिस साहेब, म्यान्सफिल्ड, साहेबा सारख्या कमिशनरांनीं, त्यांच्या कामांत मन घातलें होतें. असो असाच त्यांचा जय होवो.

**सत०**–महाराज एकदां होऊं द्या. ( सर्व यशवंतराव महाराजकी जय अशी गर्जना करतात. )

**विना०**–बरे आहे पाटिल बोवा, राम राम.

**सतरा०**–राम राम.

**इंद्र०**–राम राम.

**सतरा०**–राम राम. ( जातात. पडदा पडतो. )

प्रवेश चौथा समाप्त.

---

## प्रवेश ५ वा.

( स्थळ–गांव सटाणें. शिवरामपंत आणि सदासुख मारवाडी कचेरीच्या बाहेर बोलत येतात. )

**शिव०**–शेठ, हा निकाल ऐकून, माझ्या तळव्याची आग मस्तकास गेली आहे !

**सदा०**–शिवरामपंत, तमे दक्षणी लोक खाली वाचाळ पंचविशीकरनेवाले ! आवी मैं बध कैसा करूं तो ? ऐशाच वकिलाकडे जाते पहिले ! तो भाऊशाब वकिल फार चांगला आहे ! ये मुर्दाड वकिलाचा कामच असा. ( बोटानें दाखवून ) तो बघा कशा तोंड लपवित चालला आहे !

**शिव०**–( पाहून ) हाच का आज तुम्हीं वकील केला होता ? ह्याला वकील म्हणतो कोण ? हा ठोंब्या वकिल म्हणून प्रसिद्ध आहे. तुम्ही भाऊसाहेबांकडे जाणार म्हणता, तर मीही तुमच्या बरोबरच येतो. आणि प्रथम त्यांना हेंच विचारायचें कीं; कायद्यांत असें एकादें कलम आहे कां, कीं, त्याच्या योगानें भयंकर गुन्हेगाराला सुद्धां शिक्षा न देतां अजिबात नुसत्या दंडावरच ती भागवण्याचा माजिस्ट्रेटास अधिकार आहे ?

**सदा०**–तुमचा लोकांचा बिघडतो इथेंच ! माझ्या संगती येऊन, तेथें तुम्ही काय करणार ? पहिले मला बोलूं देणार, कां तुम्हीच घुसणार ?

**शिव०**–बरे बोवा, तुमच्या बरोबर आम्ही येत नाहीं ! आम्ही आपले मागूनच जाऊं. आणि तें बरोबर आहे तुमचें म्हणणें. असलीं कामें म्हणजे वकिलांस शांतपणानें समजाऊन दिलीं पाहिजेत.

**सदा०**–माझा तशा बोलणा नाय. तुह्मी येऊं नका, अशा मी कुठें ह्मणतो ? एकानें केला कीं, दुसरा करतो ये तुमच्या लोकांची रीत सांगितलीं मी ! आणि तशल्या लोकांच्या हातून काम होत नाहीं, अशा ह्मणतो मी. तुम्हीच बोला माझा ह्मणणा खरा किं खोटा!

**शिव०**–( दाखवून ) ही मंडळी कचेरींतून येत आहेत. तुमच्याच विषयीं, कांहीं बोलताहेत मला वाटतें ! ऐका, ( बाजूला होतात. दूसरे दोन चार गृहस्थ बोलत येतात. )

**पहि०**–खूपच संतापला हं तो माडू आज ?

**दुस०**–व्याजं घ्यायला पाहिजेत हवीं तशीं, कशीं मिळणार ?

**तिस०**–मग ही अशी स्थिति होते, रुपयाला दोन आणे; काय लेंकाहो व्याजें घेतां का काय करतां ?

**चव**०-अहो मारवाड्याचा धंदाच तो; लोकांना असें मारायचें !

**सदा**०-( एकीकडे ) लोकाना मारायच्या. लोका कशाला मरतात ? त्यांना आम्ही बोलावणा पाठवतो काय मरायला या अशा !

**शिव**०-तुम्हीं असे दांत ओठ चांवून रागाऊं नका हो. काय त्यांचें बोलणें चालतें तें ऐकून घ्या.

**सदा**०-घेतला ऐकून.

**पहि**०-पण आज माडू संतापला खूप. " माझा व्याज गरिबाचा तुम्ही बुडवूं नका " असें शंभर वेळा नाचत म्हणाला असेल.

**सदा**०-( एकीकडे ) तुझा बाप नाचला असेल. मी तो माझा व्याज मांगत होतो.

**दुस**०-त्या शिवरामपंत द्वेष्ट्यांची अशीच स्थिती झाली. होतां कां तुम्ही त्यावेळेस ?

**सर्व**०-हो, हो, हो. ( हंसतात. )

**पहिला**०-काय लोक एकेक गमतीचे असतात हो. मुर्ती तेवढ्या प्रकृती. प्रतिवादिला त्याच्या, शिक्षा न देतां दंड केला, तर जो संतापला, आणि ह्मणे, रावसाहेब, मी बोलतो त्याची माफी असावी. आपण न्यायी आहा. या हरामखोरांनीं, आजपर्यंत माझ्या इस्टेटींत हव्यातशा अफरा तफरी करून, नुकसान केलें माझें. तर सरकार याला अगोदर माझ्या देखत, शृंखला बंधन करा. याला जेव्हां घोंगडीचा चोळणा नेसवाल, तेव्हां मला बरें वाटेल ! याला करवंटींतून पाणी पिताना पाहिन तेव्हां मला आनंद होईल सरकार. सरकार सरकारची तर त्यांनीं गर्दीच उडवली होती.

**शिव**०-करूं उद्धारगत ? याला शिव्या देऊं कांहो शेट, त्याच्या समोर जाऊन ?

**दुसरा**-तो मूर्ख खराच. परंतु त्यांचें म्हणणें, मी म्हणतों कांहीं अंशीं तरि बरोबर होतें.

**शिव**०-( एकिकडे ) असें म्हण.

**तिसरा**-पण रावसाहेबांनीं त्याची थोडी समजूत घातली का ? आपसांत भांडणें चांगलें नव्हे-वगैरे पुष्कळ. कांहीं बाकी ठेवलें नाहीं सांगायचें !

चव०—महाराजांनीं शांतपणें त्याला बोलावलें, तेव्हांच आम्हांला वाटलें याची समजूत पडेल ?

शिव०-( वेडावून ) छमजूत पडेल.

सदा०—अशा शंभर रावशाब आला म्हणून काय, पैशाच्या कामांत शमजूत काढतो काय ?

पहि०—परंतु ही रावसाहेबांची दया एकादे वेळीं त्यांना भोंवेल; कारण हें धर्मराज्य नाहीं, कायद्या कलमांचें राज्य आहे हें.

दुस०—पण मला नाहीं वाटत, असा प्रसंग त्यांच्यावर येईल !

पहि०—देव करो, आणि तसा नच येवो.

चव०—अहो हीच सर्वांची इच्छा ( पाहिल्या सारखें करून ) अरे ह्या माडूनें आणि शिवरामपंतांनी आपलें भाषण एकलें वाटतें ? ( जातात ).

सदा०—चला. कुटाळ लोका संगती आमाला काय करायचा है ?

शिव०—अहो शेट, हें आलें भाऊसाहेबांचें घर. मारतां हाका कां मारूं मी ?

सदा०—( शिपाई दिसतो त्यास ) भाऊसाब घरांत हैत का ?

शिपा०—त्ये चिटणीस साहेबाकडे गेल्यात. चिटणीस साबांची सवारी आलीया नाहीं का, बडया साबाबरोबर ? नाहीं तर दोन घंट्याशीं या, गांठ पडेल.

सदा०—बरें आहे. चला तर तिकडेच जाऊं. चिटणीस साबांची भी आपली ओळख हाय, त्येंचीभी यांमंधी सल्ला पायज्ये.

शिव०—चला, पण हा प्रथमच नन्नाचा शकून चांगला नाहीं.

सदा०—शकूण बाकूण आमी तो कायभी जाणते नाहीं. ते तुमचा बामणाचा काम.

शिव०—चिटणीस साहेबांचें राहण्याचें ठिकाण आहे कां माहित तुम्हांला ?

सदा०—तुमी चला. आमाला शगळा माहित हाय. नशला म्हाहित तोभी आमी माहित करून घेते. (दाखवून) ये पलिकडला वाडा चिटणीसांचा. या मंदिच ते उतरत असतात, इथें आले तेव्हां.

शिव०—हं, हाच. हा शिपायी बसलेला आहे देवडीवर.

सदा०—क्या शिपाय भाई, चिटनीस साब क्या करते हैं? भाऊशाब वकिल अये हैं के इदर?

सिपा०—जाव. अंदर पुछो. चिटणीस साब दिवाणखानेमें बैठे हैं. (पडदा उघडतो. चिटणीस, वकिल, बापूसाहेब बसले आहेत.)

चिट०—ह्याच कारणा करतां मला तसें करावें लागत आहे. (पाहून) हा तीन शेंडया कशाला येत आहे? हा तरी त्याचपैकी एक आहे.

वकिल—कसेंहि असलें तरि मला वाटतें, तुम्ही या कामांत काना डोळाच करावा. राग मानूं नका. माझ्या जे बुद्धिला वाटलें तें मी तुमच्या पुढें ठेवलें. कां बापुसाहेब?

बापुसाहेब—चिटणीस साहेबाना तुमचें म्हणणें नाकबूल नाहीं, हें मी सांगतों. कानाडोळा, कानाडोळा म्हणजे किती वेळ? एक-वेळ, दोन वेळ, तीन वेळ.

चिट०—(मारवाडी येतो त्यास) या शेटजी बसा. हे दुसरे कोण आज बरोबर आणलेत?

सदा०—ज्याचा डोका तापतो तो, नदीकडे धांव मारतो साब. खरा कीं नाय बापुसाब? (शिवरामपंताकडे बोट दाखवून) माणूस लायखिचा हाय. कां भाऊसाव, आमी तुमच्याकडे आत्तांच गेले होते, तुमी इकडे आल्याची खबर लागली, तो इकडेच यावा अशा बेत केला, म्हणजे चिटणीस साबांचाभी सल्ला घ्यायला सापडेल, अशा बेत. का साब? त्या अर्जाचा काय निकाल झाला? इकती सही त्येचावर होती तो.

चिट०—अरे करायचें तितकें आम्ही केलें, नाहीं धोंडा लागला त्याला आम्ही काय करणार?

यदा०—झाला कशा काय तो तर आम्हांला कळला पाहिज्ये.

चिट०—कळून करणार काय तुम्ही? तेथें कांहीं तुप रोट्या नाहीं झोडायच्या. साहेबांनीं आमच्या तपास केला! पारोळकरांच्या

जबान्या घेतल्या. त्यांनीं सांगितलें, आम्ही रावसाहेबास पैसा कर्ज ह्मणून दिला नाहीं. धर्मार्थ दिला आहे. झालें तें सर्व बरें झालें, आतां दुसरी एक तोड—

सदा॰—दुसरा अर्ज तयार करते का आतां साब ?

बापुसाहेब—दुसरा कशा संबंधाचा ?

सदा॰—आमाला काय संबध माहित ? आमी काय लिवणारे आहो ? तुमी दुसरा अर्ज करते काय आशा मी पुछतो तमाला ?

बापु॰—हें तें सगळें प्रकर्ण, ( देतो ) वाचा. तुह्माला वाचतां येत असेल तर ! ( मारवाडी घेतो. )

वकिल—( शिवराम पंतास ) कां शिवरामपंत, तुह्मी आज कुणीकडे इकडे ? तुह्मी या भानगडींत आहां कीं काय ? ( स्वगत ) पक्की भांडखोर असामी, लोकांचे कर्जे घेऊन, भांडत बसणारा; याला मी पुरा ओळखतों.

शिवराम—नाहीं. आपला सहज या शेटजी बरोबर; आपल्या-पाशीं थोडेंसें काम आहे माझें.

चिट॰—का भाऊसाहेब, कोठेंहि बसा, तुमच्या कुळें अगदीं पाठीस लागलेलीं ना ?

वकि॰—कसली, कसली ? अहो किती झालें तरि अधिका-राची गोष्ट वेगळी आहे.

सदा॰—आतां आमी भाऊसाहेबाना विचारतो, दुसरा अर्ज करावा कां नाय तो ? काय भाऊसाब, तुमचा मत कशा पडतो या कामांत !

वकि॰—माझें मत विचाराल शेट, तर तुम्हांला खरें सांगतों, आम्ही वकिल म्हणजे, कसे आहों कीं, कोणाची नुकसानी म्हणजे, आम्हांला आनंद. जरी आमच्या पक्षाचा विजय व्हावा, असें आम्हांला वाटतें, तरी तें तेवढ्या पुरतें. पण ह्या वकिलीच्या धंद्यात जो पडला त्याला, खरी आनंदाची, आणि उकळी फुटवणारी, खबर म्हटली म्हणजे, नुकसान. लक्ष्यांत असूं द्या कीं, तुम्हीं असल्या लोकांच्या नादीं लागूं नका. खड्ड्यांत पडायचें असेल तर

आमचें कांहीं बोलणें नाहीं. शिवाय ज्याच्या बाजूला आज हजारों लोक आहेत, अशा सूर्यापुढें, आपलें काजव्याचें तेज दाखविण्याला जाणें, म्हणजे तें शहाणपणाचें काम नाहीं. तुमच्या हिताची गोष्ट सांगितली, यांत राग मानूं नका.

**सदा**०—बरा साब ! दुसरी तोड कशाची आपण बोलला ?

**चिट**०—कळेल ती.

**बापु**०—( मारवाड्यास जवळ येण्याची खुण करून त्याच्या कानांत सांगतो. ) समजला ?

**सदा**०—हं अशा कांहीं करेल तो होएल. मशलत चांगली हाय ! माझ्या मनांत तो अशाच होता.

**बापु**०—अरे म्हणूनच तशा केला. ( शिपाई येतो त्यास ) काय ओहरे ? इतकी गडबड कसली आहे ?

**शिपा**०—सांहेबास्नी, आन् तुमास्नी, आत्तांच्या आत्तां तिजोरी कडे बलावल आहे ? गोरा साहेब तिकडच गेला हाय.

**चिट**०— चला तर बापुसाहेब आतां विलंब नको. ( शिपायास ) चल रे तीं दप्तरें घे. ( शिपाई दप्तरें घेतो. )

**बापु**०—देवच पावला. चला शेटजी गम्मत पाहायची असेल तर ? ( हंसतो. )

**सदा**०—चला. शिवरामपंत तुम्ही येतों कां जाते घरीं ?

**शिव**०—जातों आम्ही.

**वकि**०—( चिटणीसास ) बरें आहे, आम्ही घेतों रजा !

**चिट**०—चला बोलतच जाऊं असे. रस्ता एकच आहे तुमचा अमचा.

**वकिल**—चला बापुसाहेब, तुम्ही तर सर्वांच्या पुढें पाहिजेत. कारण ह्या नाटकांतले सूत्रधार आपण आहा ! ( हंसतो )

**बापु**०—कसले सूत्रधार, आणि कसले विदुषक ? साधु पुरुषाच्या विरुद्ध कुभांड घेणारे म्हणजे पापी आम्ही. ( चालतात. )

**चिट**०—पण मी ह्मणतों, साधुपुरुष असला तर त्याच्या सत्कृत्या बद्दल, त्यांच्या हजारवेळ पाया पडावें. म्हणून त्याचीं दुष्कृत्यें असतील तीही छपवावी किं काय ?

सदा०—हाच, हाच आमचा ह्मणणा. ह्येच्यावर कोण काय बोलतो तेंच आमाला बघायचा आहे ?

बापु०—आणि दुसरी गोष्ट अशी कीं, जर खरें सोनें आहे, तर त्यानें तांब्याला कां भ्यावें ?

सदा०—<br>चिट०— } बरोबर बरोबर. ( वकिल जातो. )

सदा०—ए भाऊशाब, वकिलीच्या कामाला, नालायक माणूस होत चालला.

चिट०—शेट, या वकिललोकांचा एक भ्रम असतो.

बापु०—तो भ्रम कुठपर्यंत शेट ?

सदा०—ते तर बराबरच.

चिट०—व: बोलतां बोलतां, किती लवकर आपण या तिजोरी ऑफिसा जवळ येऊन पोंचलों ?

( पडदा उघडतो ट्रेझरीइन्स्पेक्टर वगैरे दिसतात. जवळ जाऊन सलाम करून चिटणीस वगैरे खुर्च्यांवर बसतात. )

ट्रे० इ०—चिटणीस, टुमी लोकांनीं खबर डिल्यावरून, मी सवटा ट्रेझरी टपासण्याला आलो आहे.

चिट०—( अर्ज पुढें करून ) साहेब, हाच तो अर्ज. ह्याच्याखालीं ज्यानें सही केली आहे, तो चांगला इभ्रतदार असून, खोटा मजकूर तो कळवणार नाहीं.

बापु०—साहेब मला वाटतें, रावसाहेबांचें याच्यावर काय म्हणणें आहे तें ऐकून घ्यावें !

ट्रे०इ०—ओ येस. सिपॉय, बुलाव, मामलटदारकूं.

शिपा०—जी, साब. ( म्हणून जातो व रावसाहेब यशवंतरावमहाराज यासह प्रवेश करतो. )

सदा०—ये बडा गम्मत होनार येथें !

चिट०—(मारवाड्यास) स्वस्थ राहून गम्मत पहा आतां नुसती !

ट्रे० इ०—मामलटडार तुमचा खजिना बराबर हाय !

महा०—साहेब, थोडें माझें नम्रपणाचें विचारणें आहे किं आजचा

दिवस तिजोरी तपासण्याचा नाहीं, मध्येंच तिजोरी तपासण्यास येण्याचें कारण काय तें कळवण्याची मेहरबानी झाली पाहिजे.

ट्रे०इ०-(अर्ज पुढें करून ) ह्या आर्जीट काय लिखलेला हाय टो बघा, टेव्हां टुमाला शमजेल, आमी मडे टपासाला कां आले !

महा०-( अर्ज घेऊन मनांत वाचतात. )

बापु०-( हळूं चिडणीसास ) चेहरा फिरला राजश्रींचा. कर्म केलेलें झाकतें काय ? ( हंसतो. )

चिट०-( हंसत ) बातमी मुळींच खोटी नाहीं ही. पक्का तपास आहे मला. पण त्या मानानें चेहरा घाबरलेला मुळींच दिसत नाहीं.

ट्रे०इ०-बोलो जल्दी, सून. मामलटडार, ये काम चांगला नाय टुमी पिपल आयसे लोक, टिजोरीची अफरा टफर करटे ये.

महा०-साहेब, कांहीं विघ्नसंतोषी लोक, माझ्या वाईटावर आहेत ! हे मी आपल्याला एवढ्या साठींच सांगतों कीं, आपण त्यांच्या लिहीण्यावरून माझ्या अब्रूस कमीपणा आणण्यास तयार होऊं नये. मीं सरकारची नोकरी किती नेकीनें बजावित आहें, हें साहेबांना सुद्धां माहित आहे. परंतु त्याचा उच्चार आज या कारणामुळें, मला माझ्या मुखानें करावा लागत आहे. श्रीनृसिंहाला साक्षी ठेऊन मी या दयाळू सरकारच्या तिजोरींतून, सरकारच्याच गरिब प्रजेच्या रक्षणासाठीं पांचशें रुपये काढले आहेत. आणि ते मी मुदतींत ठेवण्याचा पूर्ण निश्चय केला आहे.

ट्रे०इ०-( रागानें पहात ) ए यू, सरकारची टिजोरी लुटणारा मामलटदार, टुला बिडी ठोकली पाहिजे.

( चिटणीस, बापूसाहेब, व मारवाडी आनंदानें एकमेकांस खुणावतात. )

महा०-श्रीनृसिंहाच्या मनांत असेल तर होईल तसें !

ट्रे०इ०-( चिटणिसास ) शिरनिर शिरनिर क्या बोलटे ये ?

चिट०-साहेब ते आमच्या हिंदूंच्या देवाचें नांव आहे.

बापु०-देवानें आपल्याला तिजोरी लुटायला सांगितलें, असें बोलताहेत ते साहेब ?

ट्रे०इ०—( महाराजास रागानें ) ए यू. अशा बोलटे टुमी ? टुमच्या डेवानें टुमाला टिजोरी लुटायला सांगितला ? कोणचा डेव टो बटाव !

महा०—साहेब, देवानें सांगितलें असे माझे शब्द नव्हते. मीं इतकेंच म्हणालों कीं, श्रीनृसिंहाच्या मनांत असलें तर तसें होईल. म्हणजे या हातांना शृखंला बंधनाचे सोहाळे होतील. आणि त्या प्रभूच्या मनांत नसेल तर आपणा मानवांच्या हातून काय होणार आहे ? त्याची लीला अज्ञानास कळत नाहीं. म्हणून तो त्याची सत्ता सर्वत्र भरलेली आहे, हे जाणत नाहीं. आपलीं मानवांचीं राज्यें, देवाच्या राज्यांत मुंग्यांच्या राज्या सारखीं आहेत ! म्हणून मानवांनीं गर्व न करतां त्याला भिऊन वागावें !

ट्रे०इ०—ज्यांनीं टुमाला टिजोरी चोरायला सांगिटली, त्याला भिऊन वागावा ? त्याचा बाप आला टोभी नाय आपण त्येची द्यास्टि बाळगणार ! ( बुट आपटतो ) सिपाँय बिडी मंगाव फौजदारके बुलाको जाव. (शिपायी जातो. )

महा०—नृसिंहराया, मी जें केलें, तें तुला मान्य असलें म्हणजे चिंता नाहीं. मग माझे कितीही हाल, अपेष्टा, विटंबना, होवोत ! अपमानाच्या कड्यावरून जरि माझा कडेलोट केला, तरि सुद्धां मला तिळमात्र वाईट वाटायचें नाहीं. कारण तुझ्या भवतारक नामस्मरणाचा महिमा, मला माहित आहे. प्रभो, प्रऱ्हादा करतां अवतार घेऊन, त्याचें रक्षण केलेंस हें तुझें ब्रिद आहे ! तुझ्या ब्रिदावर विश्वास ठेऊन मी शांतपणें सर्व दुःखें भोगण्याला तयार आहें !

ट्रे०इ०—( फौजदार येतो ) फौजडार इस्को बिडी ठोक. ये टिजोरी लुटणारा मामलटडार हाय.

फौजदार—( स्वगत ) काय मजवर प्रसंग आणलास हा परमेश्वरा ! आतां या हातांनीं या साधुवर्यांना शृंखला बंधन व्हायचें काय ? ( उघड ) साहेब, बिडी ठोकतोच मी. असा गुन्हा होणें, हें चांगलें नाहीं. पण आपण पुरी चौकशी केली आहेना? नाहीं तर मागून आपल्याच गळ्यांत यायचें ! कारण असल्या खोट्याबातम्या देणारे पुष्कळ लोक असतात !

**चिट०**–( साहेबास फौजदार महाराजांच्या बाजूला असल्या बद्दल खुणावतो. )

**ट्रे०इ०**–फौजदार, टुमची भी ये लूटमंडी भागी हाय अशा मला वाटतो !

**महा०**–शिव, शिव ! नृसिंहराया, मी लूट केली कीं सरकारच्यांच गरीब अनाथ लेंकरांचेंच रक्षण केलें, हें तुला ठाऊक ! देवा तुझ्या घरीं न्याय आहे, तेव्हां या देशचा प्रजेचा कर या देशाच्याच प्रजेच्या रक्षणाच्या मुख्य हेतूकरतां आहे, आणि तो हेतू मीं राखलेला असून, तो पैका परत स्वतःच्या पदरास खार लावून भरण्याला तयार असून, असा गहजब झालेला तुला आवडतो ना देवा ! तुझी इच्छा ! हें कलीचें राज्य आहे; सोडव यांच्यांतून लवकर.

**फौजदार**–( स्वगत ) पैसे तिजोरींतून काढल्याची गोष्ट, महाराज स्वतःच कबूल करीत आहेत. तरि त्यांतला हेतू वाईट नाहीं (उघड) साहेब आम्हांला नेहमीं असे अनुभव येतात, म्हणून म्हटलें एकदां तिजोरी तपासून रुपये कमी असल्याचें आढळलें, कीं कोणाचीहि कायदेशीर भीती राहिली नाहीं, बिडी ठोकायला.

**ट्रे०इ०**–ये टुमच्या केहेना बराबर हाय टो चलो, गिनो? ( तिजोरी उघडून रुपये मोजतात, ते बरोबर भरतात. ) अरे ये क्या भूत चेष्टा हाये. भूल होगी, फेर गिनो. ( पुन्हां मोजतात, तरीबरोबर भरतात, साहेब ओशाळतो. )

**ट्रे०इ०**–( महाराजास ) ये कशा झ्याला ? टुमी रुपये काढला होटा, टो पुन्हां कशा येऊन बशला ! टुमी आमाला फसवला, खोटा बोलून ? खरा बोला !

**महाराज०**–( आनंदाश्रुचें भरतें येऊन ) देवा, नृसिंहराया, तुला संकट पडलें रे माझें ! तुझयावर भार घालून बसलों ! यःकश्चित कारणा करतां तुला श्रम दिले ! त्या पेक्षां माझी विटंबना झाली असती तर त्यांत काय वाईट होतें ! आतां हें मी यांना कसें समजावून सांगू ? या अभाविकांना तुझी लीला काय समजणार ! भावरुप कल्पवृक्षाची यांच्या जवळ किंमत नाहीं ! आणि ज्यांच्या

जवळ किंमत नाहीं, त्यानां सांगून काय उपयोग ? याचा हे विपरीत अर्थ मात्र करतील !

ट्रे॰इ॰–( गाहिंवरून, महाराजाकडे पहात ) मामलडार. टुमी टुमच्या मनाला वाईट वाटून डेऊं नका. आमी टुमचा अब्रू खलाश करावा म्हणून ये केला नाय ! टुमी आपले तोंडाशी कबूल आले होटे टो ये चमत्कार कशा झाला ?

**चिटणीस॰**–( बापूसाहेबास हळूच ) धडगत दिसत नाहीं आतां आपली. हा साहेब पण त्यांच्या बरोबर रडायला लागला !

**सदा॰**–( स्वगत ) मलाबी दया येते महाराजांची. फार वाईट काम यें खोटा लिवना आपण तो नाय लिवनार.

**फौजदार॰**–साहेब, फार जंटलमन् आहेत हे. ह्यांना आमचे हिंदु देव मानतात. ह्यांचा सर्व भरंवसा देवावर आहे. देवानीं रुपये तेथें भरून ठेऊन, आपली बूज राखली; म्हणून ते देवाची प्रार्थना करित आहेत.

ट्रे॰ इ॰–टो अशा जंट्लमन्ची, आमीभी माफी मागून, त्यांच्या पाया पडटो. ( टोपी काढतो. पडदा पडतो. )

अंक पहिला समाप्त।

---

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

( स्थळ, सटाणें, एक रस्ता. पात्रें–महाराजांचा गडी काळू व भडजी हातांत पळीपंचपात्री घेऊन एकाबाजूनें येतात, व दुसऱ्या बाजूनें एक ग्रामस्थ प्रवेश करतो. )

**ग्रामस्थ**–( आपल्याशीं ) या भडजीला विचारावें, हा महाराजां कडलाच दिसतो. त्यांच्याच घराकडे चालला आहे. बरोबर गडी महाराजांच, आहे, शंका कशाला ? याच्या जवळ महाराज, शिंदे सरकारच्या भेटिला कधीं जाणार, ही बातमी बरोबर लागेल.

आपलें जायचें संधान जुळलें तर पहायचें बरोबर. चैन मारायला सांपडेल चार दिवस मुंबईला ! शिंदे सरकारचा थाटहि नजरे खालून जाईल ! ( उघड ) भडजीबोवा, महाराजांकडे आपलें वास्तव्य असतें काय ? थोडें आपल्याला विचारायचें होतें एका गोष्टि संबंधानें आपलें म्हणणें आटोपलें असलें तर. ( भडजी–गड्याकडे बोट दाखवतो, व बोलायचें नसल्यामुळें हुं हुं अशा खुणा करतो. )

**काळु०**–( ग्रामस्थास ) तुमास्नी काय बोलायचं असेल, तें मापाशी बोला, हे भडजी आजच आल्याति नव. त्येंची सिंघ्या चाललिया. त्येस्नी गोट बिट काय ठावं नाहीं. त्येस्नी या गावामंदले रस्तेबी म्हाईत नाहीती. त्ये पाई तर मी त्येंच्या संगतीं दावाया आलुं. कायची गोट ईचारनार, ती इचारा की; तुमास्नी काय जेवाया बिवाया हुव असलं, तर चला माज संगती. त्येचं कशाला इकतं हूव, इचाराया आन् सवराया !

**ग्राम०**–अरे बाबा, जेवायला नको आहे मला. माझें जेवण झालें आहे महाराज मुंबइला जायला कधीं निघणार, एवढेंच विचारायचें होतें शिंदे सरकारच्या भेटिला जायचें आहेत ते.

**काळु०**–त्ये इचारता व्हय. ह्ये निघनारच बघा, आता जेवणा खाणा आटपली कि, समदी तयारीन् बांधाबांध झालीया. लई मंडली चलाया निघाल्याती मंबई पघाया. चिभन मौज नव्हका जनु ! ( हंसून ) चला राव, तुमास्नीबि या लटांभरांत घुसाया घावल ! थत काय, कोन नाइ म्हननंवालं थोडेच हाए ?

**ग्राम०**–इथून कुठें मनमाडावरती जायचें होय ? मग पुढें आगगाडीनें–

**काळु०**–चला राव, येयाचं असलं मनांत, तर घाइ करा. आन झटपट तयारी करूनशान, बिगीबिगी आमच्या फौजमंदी मिळा येऊनशान !

**ग्राम०**–बरें तर. ( गडबडिनें जातो. )

**काळु०**–चिभन मी गमतुया काय ? पाय उचला भडजी, बिगीबिगी गेले पाहिज. ही आरोळी आलिया नव्हका ? माधुराव वाहूळ माझी वाट पघत असत्याल. लवकर ये म्हून त्येनी मला,

बजावल हायना ! त्ये रामाच देऊल तरि न्हायलच. येकादा वाटसरु मिळायचा थत. पन कामाची गर्दी लयी आज, म्हून नाहीं झाला येळ असं सांगन माधुरावना. बिगिबिगी भाकर खाऊनशान गाड्यामंदि सामान भरलं पायज अदुगर ! ( पुन्हां पडद्यांतून काळु अशी हाक येते. )

**काळु॰**—जी. ( पुढे जातो. पडदा उघडतो माधवराव व नारायणराव बोलत आहेत असें दिसतें. )

**माध॰**—काळु, राहिलें नाहिंना आतां कोणतें हि ठिकाण ? बघ, नाहीं तर शिंच्या ठेवलें असशिल एकादें ?

**काळु॰**—आज लई कामाची गडबड दादा. त्ये रामाचं देऊळ ग्येलंच राहून गडबडीत, तथ पन पघा, असतया अन नसतयाबी वाटसरु. आतां बिगीबिगी भाकर खाऊनशान, सामान भरलं पाहिज्ये गाड्या मधून.

**माध॰**—तें काहीं नाहीं. अगोदर काळ्या अस्सा रामाच्या देवळांतून जाऊन ये. इकडे गाड्या भरायला, लावतो मी दुसऱ्या कोणाला तरि, जा, जा पळ. (काळ्या जातो. ) अरे कासऱ्या, ए चिमण्या;

( ते ' जी ' म्हणून येतात त्यास ) अरे, तुमच्या भाकऱ्या खाऊन झाल्या असतील. तर गाड्या भरायला लागा. उठवा ते बोजे झराझर !

**चिमण्या॰**—  
**कासऱ्या॰**— } जी उठवतोया. ( गाडीवानास मोठमोठ्यानें सादा घालित जातात. )

**नारायण॰**—ही एक मोठी मौज उडून राहिली आहे बुवा या वेळेस ! पण या सगळ्या मौजेचा प्राण कोण, तर महाराज.

**माधव॰**—चला बहुतेक तयारी झाल्या सारखी आहे. सामान सुमान ज्याच्या शिवाय अडणारच, असें कांहीं राहिलें नाहीं आतां बांधायचें. गाड्या भरल्या किं, करा म्हणावें निघण्याची तयारी.

**नारा॰**—आपल्याला तर ही अगदीं, नव्यानेंच मुंबई पाहायला सांपडणार. तुम्हाला माधवराव ?

**माध॰**—प्रसंग पडेल तर ना ? प्रसंगच नाहीं, मग जातो कोण ?

हें तरि जाणें म्हणजे काय शिंदे सरकारला, ही ईश्वरानें बुद्धि दिली. चमत्कार वाटतो बुवा !

**नारा०**—चमत्कारा सारखीच गोष्ट आहे, शिंदे म्हणजे केवढें बडे प्रकर्ण तें !

**माध०**—राजे लोकांच्या एकदां मनांत आलें कि आलें. लहरीवर असतें या लोकांचें !

**नारा०**—ही केवळ लहर म्हणूं नका माधवराव. अशा पुरुषाचें, कोणाला दर्शन घ्यावेंसें वाटणार नाहीं ? मग हे तर शिंद्याचे वंशज ! महापराक्रमी भक्तिमान घराणें. महादजी शिंदे, वगैरे कसले भक्तिमान पराक्रमी पुरुष होऊन गेले. आणि हे महाराज कांहीं कमी नाहींत. जयाजीराव शिंदे ! पाणीदार—कडक उपासना शिवाची.

**माध०**—लहरी म्हणजे माझ्या बोलण्याचा तसा अर्थ समजूं नका. अहो इतकी श्रद्धा राहिली आहे कुठे ? पण महाराजांच्या मनांत येतांच, लागलीच मुंबई सरकारला कळवून पार.

**नारा०**—मुंबई सरकारनें बरा अडथळा केला नाहीं. लागलीच अर्जंट तार कलेक्टरकडे नाशिकच्या.

**माध०**—अं: अडथळा कां करिल ? महाराजांची योग्यता काय जाणत नसेल मुंबई सरकार ?

**नारा०**—' यशवंत ' नांव अगदीं योग्य आहे. ( इतक्यांत काळू येतो. )

**काळू०**—माधोराव दादा, गाड्या भरून समद्या दिल्याती लावून झोरं. त्यसनी सांगितलया कीं, मनमाडाचा रस्ता धरा. आपलं अच्यारी पानकंभि चालल्याती एक गाडी घेऊनशान्.

**माध०**—जा जा, त्यांनीं देव वगैरे महाराजांचें सामान बरोबर घेतलें आहे कां विचारून ये.

**काळू०**—तेंच सांगाया पाई आलुया जी. गोविंद भटानं सांगितलया देव बिव समदं मी घेऊनशान पुढें झालो, तुम्ही निघा समद्यांना घेऊन बिगीबिगी. महाराजबी निघालं. चिमण्या जुपतोया गाडी.

**माध०**—चला तर. ( सर्व जातात. )

प्रवेश पहिला समाप्त.

---

## प्रवेश २ रा.

( स्थळ—कल्याण स्टेशन. प्लाटफार्म, दर्शनार्थ जमलेली मंडळी व युरोपियन आपल्या लेडिसह फिरत आहेत वगैरे देखावा. )

**एक**—गावांत हं हं म्हणतां बातमी पसरली. तारावर तारा चालल्या आहेत आज. कळायला किती उशीर ? महाराज, या गाडिनें येणार इतकें कळलें मात्र, जो तो उत्सुकतेनें लागला धावायला स्टेशनाकडे. ही पहाना किती गर्दी जमली आहे ती. रिघ नाहीं माणसाला ! काय कलकल चालवली आहे, बोलून सुद्धां देत नाहीं ही मंडळी. बायकांच्या कुठें गेल्या तरि गोष्टि संपायच्या नाहींत. इथें आतां दर्शन घ्यायला आल्या आहेत, तरि घरच्या गोष्टि चालूच आहेत. डोकें उठलें बुवा आपलें ! मलाहि याच गाडिनें मुंबईला जायचें आहे. ( घड्याळाकडे पाहून ) अरे पण आज गाडि लेट आहे बरिच.

**दुसरा**—गाडिचा आज ठिक ठिकाणीं खोळंबा होत असेल पुष्कळ ? ( तारमास्तरकडे पाहून ) काय हो असेंचना ? याना माहित असलं पाहिजे. टेलिग्राफ सगळा यांच्या हातांत !

**तारमास्तर**—तरि हूकूम सुटले आहेत वरून, किं फारवेळ गाडी डिटेन करूं नये स्टेशनवर. लोकांचे थवेच्या थवे जमतात दर स्टेशनावर. इंन्स्ट्रूमेंट मधून इगतपुरीला विचारलें, तर माणूस आतिशय लोटलें आहे, प्लाटफार्म सगळा माणसांनीं फुलला आहे, पोलीसांनीं प्रथम जेम तेम बंदोबस्त ठेवला होता, परंतु महाराज डब्यांतून खालीं उतरतांच, एकदम "यशवंतराव महाराजकी जय" म्हणून जी मंडळींनीं उसळी खाल्ली, तिच्या बरोबर, ज्यांनीं आडवून धरलें होतें लोकांना, असे दोन तिन पोलिस, हापटले प्लाटफार्मावर. ( हंसतात. )

**दुसरा**—उद्धट लोक ! बोरीबंदरवर आज जैय्यत बंदोबस्त ठेवावा लागेल, मुंबई आहे ती.

**तार०**—पण, प्रथम आम्हांला इगतपुरीवाल्याची वायर खोटीच, वाटली. निव्वळ थट्टा असावी, अशी आमची कल्पना होती. परंतु

इथें जेव्हां, साहा वाजल्या पासून गर्दी व्हायला लागली, तेव्हां मात्र आमची खात्री होत चालली. ( दुसऱ्या तारवाल्यास ) काय हो अझून नाहीं वार्निंग टिटवाळ्याकडून ?

**दु॰तार॰**–(वार्निंग येतो) हा ऐका सुटली गाडी टिटवाळ्याहून !

**प॰तार॰**–आतां कांहीं उशिर नाहीं. बारा मिनटांत गाडी ठेवलेली इथं. हे पहा, फळेंवाले, मिठाईवाले, उठले आपल्या छावड्या घेऊन !

**पोलिस**–चलाव. पिछे हटो. एक जग्गेपर खडा रहो. (लोकांना हटवित मागें नेतात. घंटा होते, गाडि प्लाटफार्मवर येते, स्टेशनमास्तर वगैरे मंडळी पुढें जाऊन, महाराजांस त्यां करिता तयार केलेल्या आसनावर नेऊन बसवतात. “ यशवंतराव महाराजकीं जय” असा गजर होतो. युरोपियन टोप्या काढून सलाम करतात. बर्फि पेढे नारळ वगैरेंचा वर्षाव होतो. महाराज ते सर्व “ प्रसाद वाटा ” असें सांगतात. )

**एकजण**–( महाराजांच्या पायापडून ) महाराज, गरिब आहें मी. खायला अन्न नाहीं घरांत. पदरी हें असें कुटूंब, मुलें बाळें, ( दाखवून ) दूध नाहीं मिळत यांना. असल्या बाळांना. ( डोळे पुसतो. )

**महा॰**–( नोट देऊन ) पाजा बरें दुध मुलांना !

**एक॰**–देव तुमचें कल्याण करो ( पाया पडतो जातो. )

**दु॰**–( मुलीस पुढें करून ) महाराज, गरिब आहे, मुलगी ही उपवर झालेली, द्रव्या शिवाय लग्न कसें होणार ? कांहीं हात भार लावाल तर–

**महा॰**–( नोट देतो. ) कांहीं काळजी करूं नका बरें. आणखी लागलीच गरज तर भेटा पुन्हां.

**दु॰**–अहाहा, काय दातृत्व हे. महाराज, देव आपल्याला कधीं कमी पडूं देणार नाहीं. ( मनांत ) किती भोळेपणा हा, या पैशाचा उपयोग, या मुलीच्या लग्नाकडेच लावणार ! ( जातो. )

( पुष्कळांस महाराज पैसे देतात. नंतर स्टेशन मास्तर वगैरे

महाराजांस पुन्हां फर्स्टक्लास मध्ये बसवतात ' यशवंतराव महाराजकी जय ' असा गजर होतो, घंटा होते, गाडी चालूं लागते. पडदा पडतो.)

प्रवेश दुसरा समाप्त ।

---

## प्रवेश ३ रा.

( स्थल—बोरीबंदर स्टेशन. लोक ' यशवंतराव महाराजकीं जय ' असा गजर करतात. ' गर्दी मत करो ' वगैरे पोलिस बोलून बंदोबस्त करतात. चिंतोपंत या नांवाचे गृहस्थ भाविकपणें पाया पडतात व फुलें उधळतात. महाराजांच्या गळ्यांत माळा घालतात. पेढे बरफी नारळ वगैरे वर्षाव होतो. व ' प्रसाद वाटून टाका' वगैरे शब्द महाराज उच्चारतात. 'गरीबाला दरे माय बाप' असे गरिब बोलतात, त्यास महाराज देतात. )

**एक**—( पाया पडून मुलगा पुढें करून ) महाराज गरिबि फार. मुलगा हा मुंजीचा. मुंबइची वस्ती. ब्राह्मण आहे. नांव ऐकून पायापाशीं आलो आहे.

**महा०**—( हातांतली आंगठी देतात, व दुसरे मागतात त्यास देतात, जो तो " ईश्वर तुम्हांला यश देईल " असें म्हणतो, )

**चिंतोपंत**—( महाराजांचा हात धरून, लोकांस ) बाबानो, सकाळीं महाराज आहेतच येथें. आतां त्याना जरा फराळ वगैरे करून विश्रांती घेऊंद्या. त्याना त्रास नका देऊं.

**महा०**—कांहीं त्रास नाहीं बरं. कोणाला दुखवूं नका. चला. ( यशवंतराव महाराजकी जय असा गजर होतो. )

**चितो०**—फराळाची सिद्धता आहे, तरि महाराजांनीं या दासाची एवढी सेवा घ्यावी. नाहीं म्हणूं नये, हा मी न्यायलाच आलो आहे महाराजाना. ( बगिवाल्यास ) ए कोचमन, इकडे ये ( कोचमन येतो. )

**कोचमन**—जी, हुकूम ?

**चितो०**—बोझे उठाव हें. आणखि दोन चार बगिवाल्यांना णि गाडि वाल्यांना बोलाव हे दुसरे बोजे नेऊन टाकायचे आहेत या दळींचे. ( कोचमन ' जी ' म्हणून जातो. )

**महा०**-( चिंतोपंतास ) आपला आग्रह फार दिसतो, बरें आहे; त्या नरहरीची मर्जी. चला, त्यांनींच आपल्याला वासना दिली ही. ( चिंतोपंत सर्वजातात, )

तिसरा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ४ था.

( स्थळ-मुंबई, शिंदे सरकारचा बंगला, पात्रें-जयाजीराव शिंदे, व राणी बोलत आहेत. )

**जयाजीराव**-( गळ्यांत हात घालून ) प्रिये, आज मला धन्य झाल्या सारखें वाटत आहे ! महाराजांचे चरण, मनोदया प्रमाणें आपल्या या ठिकाणास लागले; त्यांची यथा सांग पूजा करायला सांपडली. जी जी माझ्या हातून महाराजांची सेवा घडावी अशी माझी इच्छा होती, ती ती, सिद्धिला गेली. त्यांच्या तरतुदींत कांहीं कमी पडूं नये, अशी चार दिवस मी तजविज ठेवली होती, तिही शेवटीं सिद्धिला गेली; यानें माझ्या मनाला किती आनंद होत आहे म्हणून सांगू ! आतां आजचा हा शेवटचा दिवस ह्या महासाधुच्या दर्शन सुखाचा. " साधु संत येती घरा ॥ तोची दिवाळी दसरा ॥ " हें अगदीं खरें आहे. चल, तुला आतां महाराजाचें बसायाचें स्थल, किती श्रृंगारलें आहे, ते अगोदर दाखवतो ! मग तूं राणीवशात जाऊन बैस. अजून महाराजाना एक तासाचा अवकाश आहे यायला म्हणून आत्तांच हरकाम्या सांगून गेला.

**राणी**-( हंसत ) मलाहि आपल्या आनंदाची देवानें अर्धी वाटेकारिण केली आहे बरं का ! एकटंच धन्य होऊं नये काहीं ! मी नाहीं का आपल्या बरोबर झाले ?

**जया०**-( हंसत ) वः तूं अगोदर. महाशक्ति आदि माया तूं. तुझ्या मुळेंच तर या सर्व गोष्टि घडून येत आहेत. ज्यांत तूं नाहींस ते मला रुक्ष भासतें. तुझ्या शिवाय, आम्हां फटिंगाना साधु संत तरि कुठें विचारणार आहेत ?

**राणी**-खोटें नाहीं काहीं ! सितेशिवाय राम, अगस्ती मुनींचे दर्शना करितां गेले, तर दिलें कां दर्शन अगस्तिमुनीने ?

जया०–शाबास. तूं एक पंडिताच आहेस ! मला आडवलेंस खरें बुवा ! महाशक्ति म्हटलें तें काय खोटें ? ( हंसत ) बरें मला राम ठरवलेंस, तूं सीता झालीस. महाराज कोण मग ? भगवान् वसिष्ट ? हो, आदिशक्ती नाचविल तसें नाचलें पाहिजे या रंगभुमीवर. ( हनुवटीस हात लावून तिच्याकडे पहात हंसतो. )

राणी–( हंसत ) हे काय बाई ! प्रेमाच्या भरांत आले म्हणजे पुरुष काय करतील याचा बाई नेम नाहीं. मायेच्या पाशांत काहीं खोटे नाहींत हो. ( आपल्या हातांनीं त्याच्या गळयास मिठी मारते )

जया०–( तबकांतला गजरा उचलून. ) हा ह्या खोप्यावर किती रमणीय दिसेल बरें ? ( ठेऊ लागतो. )

राणी–( न ठेऊं देऊन ) अगबाई, हे काय ? ते त्या तबकांतले गजरे किनई मी आपल्या हातांनीं मुद्दाम आज महाराजां करतां तयार करून ठेवले आहेत. तो ठेवावा गडे !

जया०–असें कां ? हे आम्हाला माहित नव्हतें. हा ठेवला. ( ठेवतो. ) महाराजांवर एकंदरींत तुझी भक्ती खरी हं. किती सुबक आहे हा. उगिच स्तुति करित नाहीं, खरोखरच सांगतो, इतकी कुशलता माझ्या पाहण्यांत नाहीं. केव्हां आणि कुठें शिकलीस ही कला तूं ? बायका कुणाला दाद द्यायच्या नाहींत !

राणी–लहानपणीं शिकलें होते आपली थोडीशी. प्रसंग नाहीं कधीं करायचा आजवर, कशानें कळणार इकडे ? आज आपलें सहज मनांत आलें सकाळीं, म्हटलें करून पहावा एकदा गजरा साधलातर, महाराजां करतां !

जया०–तुझी महाराजां वरची भक्ति पाहून मला फार संतोष होतो ! ( दाखवून ) तें पलिकडलें तबक तूंच ठेवले आहेस कां ? तें लुगडें, चोळी, आणखी काय दागिने आहेत वाटतें आंत ? ठेवलेंस खरें, पण कालच्या सारखीच त्याची गत होणार आहे. तो निरिच्छ पुरुष त्यांतल्या एका तनसाडिला शिवणार नाहीं. मग काय उपयोग ? बाकी मी नाहीं म्हणत नाहीं तुझी इच्छा असलीतर !

राणी–कालच्या रुपयांच्या थैल्या, आणि दागिन्यांचे ताट,

घेतलें नाहीं, म्हणून आजचें न घेऊन तसें चालणार नाहीं. हें त्यांच्या बायकोला मी लुगडें चोळी काढून ठेवलं आहे. हें त्यानां नाहीं म्हणतां यायचं नाहीं.

जया०–तूं म्हण कांहीं. पण मला नाहीं वाटत. खरी निरीच्छ म्हणतात तीच वृत्ति आहे. धन्य त्यांची ! सर्व राज्य ओंवाळून, टाकावेसें वाटतें अशा निरिच्छ पुरुषा वरून ! इतकं कर्ज आहे, पण तितकाच धीर आहे.

राणी–मला बाई खरच पुसाल तर नवल वाटतें, कर्जाकरतां तरि त्यांनीं नाकारायचें नव्हतें. लोकांचे विंचवडे काढून टाकायला हवें होतें यांनीं ! सावकाराच्या गळ्याला फांस, नी आपल्य गळ्याला फांस !

जया०–अगे, हें पाहणें आपल्या कोत्या दृष्टिच्या माणसांचें. हें अमक्याचें, तें तमक्याचें, हा भेदाभेद त्या दृष्टिला नाहींच. जगतांतील सर्व संपत्ति त्या जगत्कुटुंबी महाराजांची आहे. आणि जगातलें सर्व लोक, हें त्यांचे कुटुंब आहे. कुटुंबांतला मुख्य पुरुष, जसे सर्वांची मिळकत एकत्र करून, कुटुंब चालवतो, तसेंच हें आहे. आणि इतका त्यांचा अधिकार आहे, म्हणूनच खुशिनें सावकार लोक त्यांना कर्ज देतात. आणि तें मिळालें नाहीं तरि फिकीर करित नाहींत. उलट त्याचा चांगल्या कामांत व्यय झाला म्हणून आनंद मानतात !

राणी–खरेंच बाई मला इतके दिवस मोठा गर्व होता, तो नाहींसा झाला. आपल्या राज्याची कथा काय, असल्या साधु पुरुषां पुढे ?

जया०–अग, अशा साधु पुरुषाच्या दर्शनाला जाण्याचा हेतु हाच. मनुष्याचा गर्वज्वर नाहींसा व्हावा, पहा बरें आज या एका महापुरुषाच्या वृत्तीनें, कितीकांच्या या देशांत वृत्त्या पालटल्या आहेत त्या ! एका कुटुंबांतली आपण सर्व आहोत, अशी थोडिशी तरि कल्पना प्रत्येकाला होत असेल ! यांत संशय नाहीं. महाराजांस नेहमीं ग्वालेरींत ठेऊन घ्यावें, असें माझ्या मनांत आहे. पण आता पर्यंतच्या एकंदर त्यांच्या स्वभावावरून, ते येतिलसें वाटंत नाहीं.

**राणी**–तरी पण आग्रह केल्या शिवाय राहूं नये. इथं त्यांना राहायला जागा दिलेली आहे, ती तरि चांगली आहेना ?

**जया**०–हें कायग ? खाशी पाहून दिलेली आहे जागा आपल्या आप्पारावनीं ! त्यांच्याकडे हें काम मुद्दाम दिलें होतें. कारण, हवाशीर जागेचे ते शोकी. त्यांना साधी जागा पसंत पडायची नाहीं !

**राणी**–महाराजांना नेमणूक करून द्यायची होती माझ्या मनांतून.

**जया**०–( हंसून ) वेडि नाहींस का तूं अगदीं ! महाराज कांहीं तरि कारण सांगून नाकारतात. त्यांना म्हटलें तुमच्या कर्जाची याद द्या. फेड करतो. तर म्हणाले " सावकाराचा मला तगादा नाहीं. तितकाचि वेळ आली तर आपणाकडून मी मागून घेईन. " ते कशाची नेमणूक घेतात ? अग, आले हेंच भाग्य समज आपलें. मुंबई सरकारास सांगून, त्यांच्या जिल्ह्याच्या कलेक्टरास तार केली, म्हणून त्यांनीं त्यांना रजा देऊन, इकडे ताबडतोब पाठवलें.

**राणी**०–पण कांहींसा हा जोराच नाहीं का झाला त्यांच्यावर ?

**जया**०–खरें विचारशिल, तर तेंच आतां माझ्या अंतःकरणाला खात आहे. पण आतां मागून पश्चात्ताप होऊन काय उपयोग ? खरेंच, आपण जरि त्यांच्या गांवीं गेलों असतो, तरि बरें होतें. झालें ते काहीं येत नाहीं आतां. ते महाराज समर्थ आहेत क्षमा करायला आपल्या दासाला !

**राणी**–पंढरिला आल्याचें सार्थक झालें !

**जया**०–अग हाच पंढरिनाथ प्रत्यक्ष मला भासतो.

**राणी**–ज्याच्या करतां एवढीं यात्रा लोटते, तो कसा पंढरिनाथ नव्हे. ( ऐकलेसें करून ) जिन्यावर पावलें कोणाची वाजली ? आप्पाराव आले वाटतें ? मी जातें.

**जया**०–जा तूं आतां. मी जाऊन महाराजाना घेऊन येतो. महाराज आल्याची तो वर्दी द्यावयास आला असेल. शेवटीं तुला आजचा महाल कसा काय शृंगारला आहे, तें विचारण्याचें राहिलेच ! ( जातात. )

चवथा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ९ वा.

( स्थळ—शिंदे सरकारचा बंगला. महाराज असनावर बसले आहेत. शिंदे सरकार पाया पडत आहेत. नंतर दुसरे पडतात. राज स्त्रिया पाया पडतात. नंतर जोरावरसिंग साथ करित असतां नथ्थेखांचें गाणें सुरु होतें. जयाजरािव—' आज नथ्येखानें, महाराजकी सेवा अच्छि कियी, और आपने गुण बतानेकि शिकस्त कियी ' असें बोलतात. पानसुपारी, अत्तर गुलाब, स्वस्तः शिंदे सरकार, महाराजांना देतात. व " आपल्या दर्शनाचा मला चार दिवस लाभ दिलात येणें करून, मी धन्य झालों " असें शिंदे बोलतात. महाराज " मी यः कश्चित मनुष्य, माझ्या दर्शनाचा लाभ तो कसला ? आपण मला महत्त्व देऊन धन्यता मानून घेतां,यांत धन्यता मानण्यासारखें कांहीं नाहीं. करतां करवितां सर्व नरहरि आहे. मनुष्यानें कोणताच गर्व वाहूं नये या सारखी धन्यता कोणतीच नाहीं" असें बोलतात. मसाल्याचें दूध सर्वांस वाटल्याबर पडदा पडतो ).

अंक दुसरा समाप्त.

---

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

( स्थळ—नाशिक वेटिंगरुम. पात्रें—जयाजिरावशिंदे, अर्स्किनसाहेब, व यशवंतराव महाराज. )

**महा०**—हिंदुस्तानांतील एका मोठ्या संस्थानाधिपतिची, आणि आमच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची मुलाखत माझ्या हस्तानें घडावी, इतकी माझी योग्यता नाहीं. तरि परमेश्वरी योगायोगामुळें, ज्याअर्थी हें काम आज मजकडे आलें आहे, त्या अर्थी मी तें मोठ्या आनंदानें करतो. ( अर्स्किन आणि शिंदे शेक ह्यांड करतात. )

**अर्स्किन**—( हात परत घेऊन स्वगत. ) बडा जवामर्द है ये

सिंधिया. मेरा हात ये शेकह्यांडमें सुरक्षित रहा, परमेसरकी खैर हुवी. ( उघड ) टुमची भेट झाली आम्हांला बहुट आनंड वाटतो. टुमी बॉंबेशी येनार, टेची आमाला खबर पोचटाच, आमी इकडे निघून आलो. टुमचे सारखे इंडियन संस्थानिक पाहणेची, आमचे आंग्रेज लोकांना बहुट इच्छा. टुमचा परिचय घडावा, टुमचा शमागम घडावा, टुमचा चाली रीटी आमच्या लोकांना माहित पडाव्या येच्या आमच्या लोकांना नाड हाय. ये हिंडूस्ठान डेश प्राचिन काळ पासून, सिव्हिलाईज्ड, आय से सुधारलेला हाय. टे करटां आमाला टेचा मोठा कौटुक वाटटो. आमाला टुमची लंग्वेज, आय से भाषाबी बोलाला चांगली लागटो.

जया०–आपणासारखे इंग्रज अधिकारी, मुद्दाम येऊन आम्हांला भेटतात, या बद्दल मला आनंद वाटतो. व मी या बद्दल आपले आभारहि मानतो. आतां आपण आमच्या देशाची स्तुति केलीत, हें ठिकच केलेत आपण. परंतु हा गत वैभव देश, आतां इतक्या स्तुतिला पात्र आहे, असें मला वाटत नाहीं. सिंहाच्या दरींत कोल्ह्यांनीं भोकावें, यांत कांहीं या देशाला मोठेंसें भूषण नाहीं. परंतु समाधानाची गोष्ट ही आहे किं, आमचे दोस्त इंग्रज सरकार, हे सर्व जगांत अत्यंत सुधारलेले असल्यामुळें, त्यांच्या अमलाखालीं आमच्या देशाला करून घेतले तर बहुमोल असे लाभ होणार आहेत. आणि इंडियन संस्थानिक जर त्यांना चाहत असतील, तर त्यांच्या ह्या गुणांमुळेंच. आम्हांला पेशव्यांचा अम्मल म्हणजे, दुःसह वाटत होता, असें कांहीं नाहीं. परंतु जी सुधारणा आज आमच्या दोस्त सरकारच्या, जातिंत आहे, ती आमच्यात नाहीं, आणि ह्याच कारणामुळें आम्हांला ही सांप्रतची स्थिती प्राप्त झाली.

अर्स्किन–आमी आंग्रेज लोक अलिकडे सुधारले. आणि टुमी आर्य, प्राचिन सुधारलेले; अशा माझा बोलना. ये टुमचा आर्यभुमी असा कशलेला हाय कि दुष्काला मंडिभी टिच्यामंडी पिक चांगला यायचा. त्याची मशागत चांगली झाली असले शिवाय, टुमाला अशा चांगला फळा लाभटो ? ( महाराजांकडे बोट दाखवतो )

आणि टुमच्या शंगटी आमाला पण व्येचा लाभ होटो. ये बद्दल आमी डेवाचे मोठे आभारी हाय.

**महा०**—कशाची कशाची फळें? मी एक यःकश्चित माणूस !

**जया०**—आमच्या लाभांत तुम्हांसहि वाटा मिळतो, या गोष्टि बद्दल कोणालाहि वाईट वाटणार नाहीं. या कसलेल्या आर्यभूमि-पासून उत्पन्न होणाऱ्या फळाची आमचे दोस्त सरकार इच्छा करतात, आणि त्या आर्यभूमिच्या लेंकरांस ज्ञानामृत पाजण्या-साठीं विद्यालयें स्थापन करण्याचीहि इच्छा करतात, हें त्यांस भूषण आहे. ह्या शिक्षणापासून हिंदुस्तानचें कल्याण होवो, आणि आमचा व आमच्या दोस्त सरकारचा सलोखा अव्याहत चालो हीच आमची इच्छा आहे.

**अर्स्कि०**—आपण इंडियन संस्थानिक, म्हणजे हिंदुस्थानचे पुढारी, ढर्म, जात, आच्यार, विच्यार, आपला, व्येंचा येक. आपल्या पुर्वज्यांनीं मागें एकवेळ पुढारीपण पटकरून, या डेशाला, मोंगल लोकां पासून स्वटंत्र केला; तेंव्हां अपनाला टेचा, अभि-मान राहना, स्वाभाविक हाय. आटां इंग्लिश लोक, एँन्ड मोंगल या मांडि किटी अंटर हाय, ये टुमी जानटाच. इंग्लिश लोक डोस्ट सरकारांचा मान कशा राखतात आणि आपले प्रजेचे हक्क कशे शांभाळतात, हे आपनाला पुढारी लोकांला माहिटी हाय. आणि हिंदुस्ठानचे पुढारी, अशा महात्म्यांच्या सल्यानें आपल्या ढर्मांची सुधारणा करतात, ये टेना मोठा भुषण हाय.

**जया०**—धर्माच्या सुधारणे साठीं, यांचा अवतार आहे. बहुत-करून राजा बदलला किं मनू बदलतो. आमच्या दोस्त सरकारांनीं, जी ही क्रांती घडवून आणली, तिच्यामुळें लोकांचीं मनें धर्मा-विषयीं, बरीच गढूळ झाली होती. ती ह्यांच्या सहवासानें, निवळत आहेत, हें या देशाचें महद्भाग्य समजलें पाहिजे. ( घड्याळ काढून किती वाजले तें पाहतात, व 'अप्पाराव' असें म्हणतात, त्यांस महाराजास देण्या विषयीं खुणवतात. )

**अर्स्कि०**—मला वाटतो, येंच्यांट डाट्ट्त्व गुण अमोल हाय.

**जया०**–तो गुण त्यांच्यात उपजतच असला पाहिजे असें वाटतें. दातृत्वाच्या सहचर्यानें राहणारे दुसरेहि पुष्कळ गुण त्यांच्यात आहेत.

**अर्स्किन**–कांहीं लोक डाटे असटाट, पण टे, ज्याना कांहीं डेटाट, टे टेना कड लागेल अशा बोलू डेटे. तशा वाईट गुण येंच्या शांट मुंद्रेवरून अगडीं कळून येट नाय. बडा महाटमा पुरुष हाय.

**जया०**–दुसऱ्यांची दया हेंच त्यांचें भांडवल आहे.

**अर्स्किन**–अशा टो खरा. पन मला वाटतो, डान कराच्या, किंवा कांहीं डेयाच्या टो लायखीच्या माणूस पाहून डिलेला चांगला.

**अप्पाराव**–( नोटी पुढें करून, महाराजांस हलकेंच ) महाराज, आपल्याला सरकारांनीं या अर्पण करायला सांगितल्या आहेत मला. तर कृपा करून यांचा स्विकार करावा.

**महाराज**–( किंचित हंसत ) छे छे छे. कृपा करून सध्या तें तसेंच ठेऊन द्या.

**जया०**–लायकीचा मनुष्य पाहून देणें,हें पूर्ण सुधारलेल्या बुद्धिचें लक्षण समजतां किं काय आपण ? तो नंबर याच्या खालीं लागणार !

**अर्स्किन**–टो मला कबूल हाय. पण निडान राजशट्टेला, म्हणजे राजशट्टा ज्यांच्या हाटांट थोडी बहुट राहटे, अशे लोकांना टे चांगला नाय, अशा माझा बोलना.

**जया०**–( हंसत ) असें पहिल्यानें कोणालाहि वाटतें खरें किं सगळेच मामलेदार किंवा सगळेच कलेक्टर जर असे दाते झाले, तर सर्वत्र बजबजपुरी माजेल, परंतु ही भूल आहे. कारण लोकांच्या गरजा भागल्या, म्हणजे तेच संतुष्ट होऊन, त्याचा कसा चांगला मोबदला देतात, याचा प्रत्यक्ष अनुभव या साधुवर्यांनीं आणून दिला आहे. असेच जर सर्व अधिकारी होतील, तर धर्म राज्य, किंवा रामराज्याचा अनुभव, या कालियुगांत लोकांना येईल ! गुन्हें हल्लीं होतात ते आपोआप बंद होतील. आपसांतलीं भांडणें मिटतील. ऋणकोस धनको सूट द्यावयास लागला, तर ऋणको ती आपल्यास नको, म्हणून त्याच्याशीं भांडण्यास उठला, अशीं उलटीं भांडणें आपणांस पाहायला सांपडतील ! तेव्हां अशा वृत्तीनें तोटा मुळींच नसून सर्वतोपरी नफाच आहे.

**आर्स्किन**–आपण म्हणटां, टे बद्दुल माझी आटां खाट्री झाली. आपला इंडिया फिलाजफीचा माहेरघर. युरोपमंडी या विद्येचा इतका उडय झालेला नाय.

**जया॰**– ( घड्याळ पाहून. ) बरें आहे, घेतों रजा मी आपली. ( महाराजांच्या पायावर डोकें ठेवतात. आर्स्किन कलेक्टर टोपी काढतो व जयाजीराव महाराजांस नोटी देण्यास पुढें करतात. )

**महा॰**–हें काय बोलतां आपण? आतांच इतकी घाई करण्याचें कारण नाहीं. तितकीच गरज लागेल, तेव्हां मी आपल्याकडून मागून घेईन. ( जयाजीराव गाडीकडे जातात. त्यांच्या बरोबर सर्व जातात. )

**आर्स्किन**–( जातांना ) कशला गलबा हा !

**शिपाई**–( प्रवेशकरून ) रावसाहेब मामलेदारांच्या दर्शनाकरतां लोक जमले आहेत साहेब. ( जातात )

( दोन गृहस्थ एकाबाजूनें बोलत येतात. )

**पहिला**–देण्याची म्हणजे त्या पुरुषाला जशी कांहीं उकळीच येते. कोणी मागण्याचा अवकाश, किं या महात्म्या पासून तो विन्मुख गेला असें व्हायचेंच नाहीं.

**दुसरा**–म्हणूनच लोकाचें महाराजांवर प्रेम आहे. जसें द्यावें तसें घ्यावें हा न्याय अगदीं खरा आहे. 'प्रिती पासूनी प्रिती वाढती' हीं अक्षरें जर प्रत्येक मनुष्यानें, आपल्या हृत्पटलावर खोदून ठेवून त्या प्रमाणें वर्तन ठेवलें, तर हा जगाचा गाडा किती सुरळीत चालेल बरें ? तशा प्रकारें वागणारा हा एकच महात्मा उत्पन्न झाला आहे, तर कृतयुगाचा भास व्हावयास लागला मग सर्वांनीच असा विचार केला तर किती सुख होईल बरें ? मला वाटतें स्वर्गांत राहणारे देव सुद्धां आम्हां मानवांचा अशानें हेवा करूं लागतील.

**पहि॰**–यांत काय संशय ? हल्लीं आम्हांला जे सुख आहे तें देवांना खचित नाहीं. अरे पण तिकडे पहा, महाराजांना त्या आंधळ्याची दिन स्थिती पाहून गहिंवर आला. ते पहा स्वतःचे अश्रु पुशित त्यास कांहीं देत आहेत ! किती कनवाळू स्वभाव !

**दुस॰**–" परदुःखेन दुःखिता विरला " असें म्हणतात तें

कांहीं खोटें नाहीं. हे आलेच महाराज इकडे. बरोबर कलेक्टर वगैरे साहेब मंडळी आहे. आपण असे बाजूला उभे राहूं. ( तसें करतात. महाराज, कलेक्टर अर्स्किन, व लोक येतात ' यशवंत-राव महारजकीजय ' होतो. पोलिस ' बाजू बाजू ' म्हणतात. )

पहि०–चला. महाराज गावांत जाताहेत, आपण पुढें जाऊन सर्वांना महाराज आल्याची वर्दी देऊं.

दुस०–बहुतकरून ती लोकांना तेव्हांच लागली असावी. पण चला, गावांत जर ही बातमी लोकांस लागली असेल तर मोठी गम्मत उडाली असेल.

पहि०–उडणारच. महाराजांवर भक्तिच लोकांची तशी आहे ( चालूं लागतात. )

दुस०–कशी आहे ती प्रत्यक्ष पहाच ही. ह्या स्त्रिया पाण्यानें भरलेले कलश घेऊन किती जलदीनें घराकडे चालल्या आहेत ! त्यांच्या भाषणांत महाराजांशिवाय विषय नाहीं.

पहि०–इथें आपल्याला घटकाभर करमणूक होणार ! उभा रहा. हे स्त्रीपुरुष महाराजांचें स्वागत करण्यांत किती गुंग झाले आहेत ते पहा ! पण नको. चलच, आपणहि अशीच कांहीं तरि महाराजांची सेवा करू. ( जातात. )

( पडदा उघडतो सुमती, रेवती आणि सुमुखी दृष्टीस पडतात. )

सुमुखी०–अग बाई, झाल्या कां रांगोळ्या काढून सुमती बाई?

रेवती०–त्या काय बाई, ज्या त्या कामांत सुग्रण आहेत ! त्यांचा हात कोण धारिल ? पहा किती रांगोळ्या जलद काढून पुन्हां कशा चांगल्या काढल्या आहेत त्या !

सुमु०–ही पाहिलीत कां रेवती बाई, मी एक आपली काढून पाहते आहे. मला मेली बरी नाहीं वाटत !

रेव०–( पाहत ) अगबाई, हिला वाईट कोण म्हणेल ? ही नका हो पुसूं तुम्ही. वाईट बिईट म्हणून पुसाल एकाद्या ! मला कांहीं बाई तुमच्या दोघींसारख्या नाहीं साधायच्या. कशा तरी घालते आपल्या. रांगोळी नासते झालं ! ( काढूं लागते. )

(इतक्यांत मधुमति, गोपिका, रुक्मिणी, वगैरे स्त्रिया प्रवेश करतात.)

**रुक्मिणी**०—पाहिलीस गोपिके, मधुमति कशी ठुमकत ठुमकत चालली आहे ती. बरी दिसते हो पण. रुपानें चांगली आहे.

**गोपिका**०—रुक्मिणीबाई, आपण नव्हतों कां अशा चालत हिच्या वयाच्या होतों तेव्हां ? मग तिलाच कां बरें हंसावें ?

**रुक्मि**०—मी हंसते कां तिला ? पण आपलं तिला तें शोभतं असं म्हटलं हो. ( पाहून ) अगबाई, पाहिलंत कां गोपिकाबाई, अजून यांच्या रांगोळ्याच चालल्या आहेत.

**गोपि**०—रेवती बाई, अहो रेवतीबाईअ—अगदीं रांगोळ्यांत गर्क—ना ? पाहुं कशा काढल्या आहेत आमच्या रेवतीबाईनीं ? ( पहावयास जाते )

**रेव**०—( तिच्या खांद्यावर हात टाकून ) ह्या पहा, आहे का कांहीं रंग रुप त्याला ?

**गोपि**०—कशाला असेल ? ( हंसत ) मेलं रुप नाही आन् रंग नाहींना ?

**सुमु**०—गोपिकाबाई, आपलं चांगलं असलं तरि कोणी आपलें आपल्याच चांगलं म्हणून घेतं कां ?

( फुलमाळी " फुलें घ्या फुलें " असे ओरडतात. )

**सुम**०—अरे ए फुलवाला !

**मधुमती**— }
**गोपिका**— } इकडे येरे फुलवाला !

**रुक्मिणी**— }
**रेवति**— } ( फुलमाळी येतो त्यास ) कसकसलीं फुलें आहेत रे?

**फुलवाला**०—बाईसाब, समद्या परकाराचे हैत. गुलाब है, सोनचापा है. मोगरा है. दवणा हाय. मदनबाण हाय. चमेलीचीं फुलं हैति. तुलसी, मरवा, आन् दुरवाबी हैत नव्हंका या व्योपल्यामंदि ! आज बगा लई इक्रि. लई इाक्रि. इक्स्याच फुलानं भरलेल्या अशा पाट्या, या डोस्क्यान् आज चार वकत वाहिल्या नव्हका ? ही चौथी खेप बघा बयासाब. करा बव्हानी बघु यशवंतराव महाराजांच्या नांवानें !

**सुमुखी**–अरे ही चवथी खेप म्हणून म्हणतोसना ? मग बोहणी कसली आतां ?

**फुल०**–तसं नव्ह, बयासाव. ह्या पाटीची व्हनार ही तुमच्याच हातची परथमची.

**रेवति**– } **गोपिका**– } कसकसलीं फुलें आहेत, तीं आम्हाला दाखव, निरनिराळी काढून बाहेर ?

**फुल०**–( काढित ) ही बघा गुलाबाची. ही जायीची. ही बघा मोगऱ्याची. देवाच्यान्, असलं मोगऱ्याचं फुल, तुम्हांला समद्या गांवामंदिबी मिळायचं नाय. ह्येची कलमं पघा मंबईशी हानलेली हायती. चिभन टप्पोरा फुल नव्हका ? महाराजांच्या गळ्यामंदि, माळ पन माळ शोभल. आपल्या मनामंदि लइ लइ येतया, पन इचारतो कोन आपनास्नी ! ( पाटी उचलून ) बोला बाईसाब वत समदी पाटी ?

**सगळ्या**–अरे पण त्याची किंमत सांगशिलना ?

**फुलवाला**–त्येची काय किंमत, तुमी द्याल ती !

**सुमुखी**–असं कसं ? निट बोल बाबा !

**रेवति०**–आपली किंमत सांग लवकर, आन् पैसे घे.

**फुल०**–बयासाब. त्येची काय किंमत करताया ? त्ये काय खायाची वस्तु हाय ? तुमी तरि महाराजाकरतांच घेनारना ? तुमच्या घरामंदि थोडीच खरचनार तुम्ही ! चला काढा किंमत, तुमच्या मनाला वाटल ती ?

**रुक्मि०**–तर मग दोन पैसे घेशिल ?

**गोपि०**–रुक्मिणीबाई, बऱ्याच आहांत हो तुम्ही तरी ?

**सग०**–तसं नको. त्याला आपले आठ पैसे द्या.

**मधुमति**–हो, त्याच्या मालाची त्याला किंमत मिळाली पाहिजेना ?

**फुल०**–बाई साब, दोन पैसे द्या, चार द्या, सहा द्या, ज्ये तुमच्या मनाला येतील त्ये द्या, म्हुन बोललो ना पहिलें तुमाला ? पन ह्य पघा, घरामंदि खरचाचा नाय बरंका फूल ? नाहींतर घालाल येण्यामंदि गजरे करूनशान. त्ये नाय कामास पडायचा.

**रेव**०–काय मेला फाजिल आहेग हा फूलवाला !

**रुक्मि**०–तुझ्या आपल्या मालाची किंमत बोल. आह्मी घरांत खर्चू नाहितर पाहिजेल तें करूं.

**फुल**०–मग बाईसाब रुपया पडल.

**सुमु**०–चार आण्याला द्यायची आहेत कां ?

**गोपि**०–हो चार आण्याचा माल आहे. नाहींतर जा कसा आपली टोपली घेऊन !

**फुल**०–आन् फुल हतच ठेऊं ? बरा बयासाब न्याव हाय.

**गोपि**०–अरे बाबा, असे अर्थाचे अनर्थ करूं नको. बारिक पोर आहेस पण फारच फाजिल आहेस.

**फुल**०–बया साब, रागाऊं नगा. काढा किंमत, कां ह्यो चाललो बघा, हत उभावी ऱ्हात नाय, तुमास्नी तरास द्यायला मंग.

**रेव**०–( चार आणे देते ) हे घे बाबा.

**फुल**०–( जातांना ) हे बघा बयासाब. फुलं झाल्याती लई म्हांग. तुमाला रुपया देउनशानबी इकती मिलाली नसती. पन् यशवंतराव म्हादेवाला समरून मी तुम्हांला दिली बगा.

( धनंजय, अरुणप्रकाश, जयरव, व इतर येतात. )

**धनंजय**–( फुलवाल्यास ) अरे ए फूलवाला !

**फुल**०–कायव दादा, फुलं झाली, समदी उडाली. तुमास्नी काय फुलं–

**अरुणप्रकाश**–त्याचें बोलणं चाललें होतें ऐकलेंत कां तुम्ही ? मोठा गमत्या आहे, त्याची थोडी गम्मत–( फुलवाल्यास ) अरे जाऊं नको. इकडे ये. आणखी दुसरीं फुलें घेऊन येतोस कां ?

**जयरव**–तुझा बाग जवळ आहे येथून कां लांब ?

**फुल**०–हाय जवलच. पन पघा फुलं आतां ऱ्हायली नाहिती. आतां गांवामंदि दुसरीकडंबी मारामारच फुलांची. दुपारपुन चिभन–

**धनं**०–( बारा आणे पुढें करून ) ही घे तुझ्या मालाची खरी किंमत. ह्या बायांना तूं फुलें दिलीस ना ? त्यांना काय म्हणलास तूं ? म्हणून–

**फुल**०–( आपल्या थोबाडिंत मारून घेऊन ) चुकलो, चुकलो, माफकरा दादासाब. आपुन खरा खरा त्येच बोललो. पन ह्ये बघा, मला लई दोड ख्वाड हाय कमजास्त बोलण्याची. कधीं कधीं ह्ये त्वांड बघा कांबुत ऱ्हातच नाय. माफ करा साब ( तोंडात मारून घेतो. )

**धनं**०–अरे बाबा, मी तुझी थट्टा करित नाहीं. तूं जें बोललास तें वाईट बुद्धिनें मुळीच नव्हतें, तूं म्हणालास फुलें फार महाग झाली आहेत, तर ही तूंच केलेली त्याची वास्तविक किंमत घे, आणि संतुष्ट होऊन जा. ( द्यावयास लागतो. )

**फुल**०–नग नग. दादासाब. मी संतुष्ट हाय पघा. त्येंची किंमत रुपाया खरी, पन तुम्हां सारख्या भल्या मानसापून मला इक्तीच पुरं. तुमच्या पायाच्यान मलाही ( पावली दाखवतो ) रुपायाच्या जागीं हाय. मी जातो आतां. वादूळ झाला, बागवान गागल कि ! (जातो)

**अरुण**०–पोरगें फार भित्रे, पण बरें आहे गमती हं !

**जय**०–बरें तें असो, फुलें वगैरे तर घेतलींच आहेत बायकांनीं.

**धनं**०–या रांगोळ्यांनीं किती शोभा दिसते ! जयरवा, आपले आम्रपल्लव जितक्या खुबीनें लागयला पाहिजेत, तितके लागले नाहींत. ते समोरच्या घराचे बघ ?

**अरुण**०–आणि त्या पलिकडल्या घराच्या खिडक्या, पहा कशा नाना तऱ्हेच्या पल्लवांनीं अलंकृत केल्या आहेत ?

**धनं**०–ते केळीचे खांब तरी किती मजेनें उभे राहिले आहेत.

**जय**०–त्यांच्या वरच्या केळफुलांनीं त्यांना फारच शोभा आणली आहे.

**अरु**०–असे पहात पहात चालले तर–

**धनं**०–तर काय वेडे आहा, सगळीकडे–सगळ्या नगरानें आज शृंगार केला आहे, कुठपर्यंत तुम्ही भटकत राहणार ? हें शहर म्हणजे लहान सहान नाहीं. ( आनंदाने ) ऐका, ऐका. हा पहा 'यशवंतराव महाराजकी जय' झाला. ती पहा उसळली गर्दी.

**जय**०–( पाहून ) जसें काहीं एकादें बंडच उठलें आहे. ( पुढे

चाललेसे करून ) अरे ए, माधव ( ओ म्हणून पुढें येतो त्यास ) पेढा बर्फिच्या टोपल्या, आणि त्या फुलांच्या घेऊन तयार असा. आणि बायकांना म्हणावें, तुम्ही ह्या अशा इकडच्या बाजूला राहा.

( उत्सवानंद, व दुसरे काही येतात. )

**धनं०**—कसें काय महाराज, फारच गर्दी झाली आहे नाहीं का ?

**उत्सवानंद**—असें तर खरें बुवा !

**आनंदघोष**—बायकांनां म्हणावें तुम्ही पंचारती घेऊन बाहेर उभ्या राहूं नका. घरांतूनच ओंवाळा. अहो गर्दी आतोनात आहे. महाराज या पेठेंत शिरलें आणि लोकांनीं जो एकदम जय शब्द केला, जी पुष्पांची, फळांची, पेढा बरफींची आणि नारळांची वृष्टि केली, तेणें करून बरोबर कलेक्टर साहेब होता; तो गुदमरून गेला. आणि लागला कांहीं त्याच्या भाषेंत ' च्याव म्याव ' करायला, पण इथें ऐकतो कोण ?

**अरु०**—मग काय झालें हो ?

**उत्स०**—साहेब मोठ्यानें ओरडून म्हणाला, माझा पेढाबर्फीनीं, जीव घ्यायचा विचार केला वाटतें तुम्ही लोकांनीं ?

**आनं०**—त्याच्यानें त्या मारापुढें धीर धरवेना तो तरी बिचारा काय करतो ? त्याला वाटलें असेल, हे आपले शिपायी वगैरे असून व्यर्थ आहेत. कारण अशा गोडिगुलाबिनें, पेढे मारित ही एक प्राण घेण्याची विलक्षण खुबी आहे. ( हंसतात. )

**धनं०**— } चला, चला. ती गम्मत तर अगोदर पाहिली पा-
**जय०**— } हिजे. चला. ( तिकडे जातात. )

पहिला प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश २ रा.

( एक म्हातारा प्रवेश करतो. )

**म्हातारा०**—( आपल्याशीं नाकांत ) अरे रामा, देवा, माझें गा-ऱ्हाणें ऐकरे बाबा एकदाचें लवकर. नको नको हा जन्म. त्रासलों अगदीं. माझें माझें भ्रांतिचें आझें खरें. पण हें केव्हां कळायास ला-

गलें मस ? आतां. तरुण असताना यंव करीन नी त्यंव करीन, असें मिशाला पीळ घालून, मी लोकां जवळ बोलत असें. माझा मुलगा, माझी दौलत, माझी बायको, माझें घर, माझीं शेतें, माझी जमीन, माझीं गुरें, माझीं ढोरें, हें सगळें माझें असें मस वाटत असे. हें माझें नव्हे अशी शंका सुद्धां कधीं आली नाहीं ! पण आतां मात्र हरलों ! आमचें कुटुंब वारलें. आम्हीं म्हातारे, असें पाहून, भावानें सगळें विष्टेंट हाताखालीं घातलें. घरांत आमचे हाल व्हायास लागले, मनांत विचार केला, आमचे वडले चिरंजिव धकटंभट मुंबईस आहेत; तर त्याजकडेस जावें, अशा बेतानें मुंबईस आलों, तर आमच्या धकटंभटानें चांगले प्रकाश पाडले, मस म्हणतो गाढवाचा लेंक, कीं "तुम्ही कोण आलात हो मोठे बायकोचे सासरे ? तुमच्या सेवा करण्यासाठीं, आम्हीं बायकांशी लग्नें लावली नाहींत ! पत्करत असेल तर इथें उष्टी काढावी लागतील. आलाच आहा आतां, बोडकें टेकायास, तर आठ दिवस रहा आणि घरीं चालते व्हा मग. तिकडे भावाशीं जमत नाहीं, आतां इकडे आले त्रास द्यायास" ! इतके त्या गाढवाच्या तोंडचे शब्द ऐकल्या वर, तसाच रागा रागानें निघालों तेथून आणि म्हटलें एकदां लिलीकडे जाऊन पहावें, तो अजून लहान आहे. याच्या सारखे त्याला अजून कान फुटले नाहींत. शिवाय हा भिक्षुकडा आणि तो वकिल. असे मनांतलें मांडे खात आमची स्वारी, तेथें जाऊन थडकली. पण तेथें गेल्यावर काय,पुत्राच्या तोंडचीं उत्तरें ऐकून, आनंदाला बोंबच ठोकावी लागली. माझा लिली म्हणून मांडीवर हगण्याचें ज्याच्या मी कौतुक करावें, त्याच्याच तोंडचीं मुक्ताफळें हीं ! परमेश्वरा, तुझ्या घरीं न्याय नाहींरे ! मस रांडलेक धडधडित म्हणाला, मी तुला ओळखत नाहीं जा. तूं माझा बाप आहेस असें, गाझिट का काय गाढवीचा म्हणाला फाजिट तें, त्यांत छापलें आहे काय ? शिनळीचा मस म्हणतो, जा, कायदेशीर हो, कायदा शीक. या जगांत जिवंत राहिला आहेस कशास असा ? अर्थात तेथूनहि आमची धिंडका निघाली. परत घरीं जावें तर हीच रड. मग निघालों भीक मागत रघुवीराच्या नांवावर. (रडत )

देवा कायरे हा प्रसंग आणलास ? मी तरुण असतांना ज्याचें पोषण केलें, त्यांनीं माझ्या लाथ मारून मस द्यावें हाकलून अँ ? लोकहो, सावध व्हा माझें उदाहरण पाहून. तुम्ही तरी असें या मायाजाळांत सांपडून फसं नका. कोणाचा कोणी नाहीं. ज्याचा तो; हें माझ्याकडे पाहून लक्ष्यांत ध्या. आणि माझी म्हाताऱ्याची कोणीतरी दया करा. ( पडद्यांत–' कोण विवळतें तिकडे ? ' ) अँ, माझी कोणाला आली वाटतें दया ? बाबा, कोण ईश्वराचा लाल असशील, तो माझ्या जवळ ये. मी म्हातारा आहे; मस जरा कमी दिसतें. ( सुमती प्रवेश करतो. )

**सुम**०–(जवळ जाऊन) हा जवळ आलों, काय म्हणतां म्हातारे-बोवा ? तुह्मी असे विवळतां का ? ह्या पुण्यांत यशवंतरावमहाराज आल्यापासून दुःख विवळणें, पार पळून गेलें आहे.

**ह्मातारा**–बाबा, त्या महापुरुषाचें नांव मी ऐकलें आहे. तो महाउदार आहे ह्मणून लोक सांगतात. पण मी हा आत्तांच पुण्यांत आलों. वीस बावीस दिवस झाले मुंबई सोडल्यास. तेव्हां-पासून माझे हाल चालले आहेत रे मुला ! पोटांत कालपासून अन्न नाहीं. पुढें पाऊल कांहीं आतां टाकवत नाहीं. ही भिक्षा आहे, पण शिजवून घालणारा, कोणी पुण्यवान प्राणी पाहिजे ना ?

**सुमती**–तुम्ही मुंबईहून आलात तर ? मुंबई सोडण्याचें कारण?

**म्हातारा**–बाबा, मी आलो तसा म्हणशील तर कोंकणांतून. कोकणांत माझें घर. मुंबइला माझे दोन मुलगे आहेत. पण ते नसते झाले तरी बरें होतें. काय तुला कर्मकथा सांगु आपली ! ( विवळत ) माझे प्राण भुकेनें व्याकूळ झालेले तुला दिसत नाहींतका बाळा ?

**सुम**–(म्हाताऱ्याचा हात धरून) बरें चला तर. तुम्हांला आयते नेऊन पानावर बसवतों, मग तर झालें ? इथें यशवंतराव महाराज आल्याचें, तुम्हांला सांगितलेंच. त्यांच्याकडे आज आहे प्रयोजन. त्यांची जन्मभूमी इथें माणकेश्वरांचा वाडा. तिचें दर्शन विधीपूर्वक महाराजांनीं घेतलें, आणि त्याची ही जेवणावळ.

**ह्माता**०–( चालत ) बरें बाबा. मस तूं एक देवदूतच भेट-

लास. मी मोठ्या फिकिरींत होतोरे बाळा. हा जीव सुद्धां द्यावा आणि सुटावें एकदां ह्या त्रासांतून, असें झालें होतें मला.

सुम०-मला वाटतें मुंबई तुम्ही उगीच सोडलीत ! तिथेंच राहिले असतेत म्हणजे इतका आटाआट तुमच्या जीवाचा झाला नसता.

म्हाता०-तें खरें बाळा. पण त्या मुंबईत राहण्याचा मस किळस येतो. आचारविचार जेथें सुटला, तेथें ब्राह्मणानें राहूं नये. बिघडलें बाबा सगळें. आतां कलियुग होणार जिकडे तिकडे. बाटे झाले सगळे लोक. ब्राह्मणांनीं ताळ सोडला. त्या मुंबईत माझें काहींच जमत नसे अगदीं सोवळ्या ओवळ्याचें. मनास तेथें होतों तों पर्यंत शुद्धच वाटत नव्हतें. उम्हासे येत.

सुम०-बरोबरच. तुम्हांला शुद्ध हवेंत गांवढ्या गांवांत राहण्याची संवय, एकदम शहरची राहणी तुम्हांला कसली आवडणार ? तशांत तें मुंबई शहर म्हणजे बकाली. जुन्या पद्धतिच्या लोकांना तर तें मुळींच पसंत पडायचें नाहीं. ह्या पुण्यामध्यें तुम्हांला काहीं बरें वाटेल.

म्हाता०-अरे बाबा, पेशवे होते पेशवे या पुण्यांत, तेव्हांची-हें असें चालेल ? फांशीं दिले असते अशा ब्राह्मणांना ! संताप येतो यांच्याकडे पाहिले म्हणजे. धर्म बुडवायास निपजले आहेत. काय करावें राजा पडला म्लेंच्छ. देवा तूं तरी अवतार घेऊन धर्माचें रक्षण कर.

सुम०- ( स्वगत ) म्हातारा धर्माचा अभिमानी कडक आहे. भूक बिक विसरून गेला रागाच्या आवेशांत ! ( उघड ) धर्मावर मोठा प्रसंग गुदरला आहे खरा म्हातारे बुवा. पण ईश्वराला आहेच काळजी. तोच यशवंतराव महाराजांच्या रूपानें अशा प्रसंगीं अवतरला आहे.

म्हाता०-अरे भगवद्गीतेंत वचनच आहे भगवंताचें कीं " यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ॥ अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ॥ " खरें सांगितलेंस तूं. यशवंतराय महाराज हा अवतारिक पुरुषच असावा.

सुम०–असावा म्हणजे काय ? हा प्रत्यक्ष पहाच. ( दाखवून ) हे पहा महाराज देवघरांत पुजेला बसले आहेत. गर्दी किती जमली आहे पहा त्यांच्या करतां लोकांची. तुम्ही या भिक्षूकमंडळींत बसा असे इकडे. इथून तुमच्या सारें दृष्टीस पडेल. ( स्वगत ) आमचा जीर्ण झालेला धर्मपुरुष, ह्या म्हाताऱ्या ब्राह्मणाच्या रूपानें तर आला नाहीं ?

( देखावा दिसतो, दोन बाया प्रवेश करतात. )

दुसरी–( पहिलीस ) अग, पड महाराजांच्या पाया. ( महाराजांस ) बिचारी नवस करकरून दमली मुलाकरतां ! महराजांच्या चरणापाशीं आली आहे आशिरवादा साठीं. ( पायापडतात )

महा०–बाई, काहीं काळजी करूं नका बरें ! श्रीनरहरी कृपा करील. पतिची सेवा करित जा, देवाचें रोज तीर्थ घेत जा. औदुंबराला सहस्र प्रदक्षणा घालित जा. कामना नरहरी पूर्ण करणार समर्थ आहे ( नारळ देतात. )

दुसरी–( महाराजांस ) मनासारखें झालें म्हणजे ती नवस फेडणार आहे महाराजांचा प्रयोजन घालून, आन् पेढे वाटणार आहे. ( पहिलीस ) आणखी काहीं विचारायचं आहे ?

पहिली–( हळूंच ) कायगं हे मेलें ? मुलां करतां कां मी नवस करून दमले ? आपली महाराजांच्या पाया पडायला आले होते, काय तरी बाई तूं आहेस गं ?

दुसरी–चुकले बाई मी. मग सांगूंकां महाराजांना अजून, किं हीला मुलगा नको आहे, आपली एरवींच दर्शनाला आली होती. नवसाला तिनें आपली उगीच मान डोलवलीन म्हणून ?

पहि०–तसें नाहींग. रागाऊं नकोस कांहीं. पण मेली आपली लाज नाहीं का वाटत म्हटलं ? बरें पण त्या गण्याला हाक मार इकडे.

दुस०–अग, हा जवळ तुझ्या उभा. इतकी भांबावलीस कशानें ? गण्या–

गण्या–जी, काय बाईसाब?

पहि०–हा नारळ ठेव आन चला.

( कडेवर बालक असलेली स्त्री, एक म्हातारी आणि एक पुरुष येतात. )

**दुस०**—अग उभी रहा. ही कडेवर मुलगें असलेली मला वाटतें तुझ्या सारखीच नवस करून गेलेली असावी. ती आतां फेडायला आली आहे. तर तुला हें पाहण्या सारखें आहे, थांब—

**पहि०**—कांहीं तरि बोलते आहे आपली ! ही थांबते हो बाई.

**दुस०**—माझ्याच करतां थांबणार किनई अगदीं. तुला नकोच असेल थांबायला मनापासून. ( बालक घेऊन आलेली स्त्री महाराजांच्या चरणावर बालक वाहते. पेढे वगैरे ठेवतात पाया पडतात. )

**म्हातारी**—महाराज आपल्या कृपेनें हा मला नात झाला बरें ! पायांवर आपल्या वाहिला आहे. आपल्या कृपेनें उदंड आउक्षाचा होवो. ह्या माझ्या सुनेलान् मुलाला जोडप्यानीं पाया पडायला आणलेले आहेत. ( त्यास पाया पडण्यास सांगते ते पाया पडतात. )

**महा०**—करता करविता नरहरि आहे, त्याचें चिंतन करित जा. यथास्थित होईल.

**दुस०**—असं जोडप्यानें यावं लागेल बरं पाया पडायला ? हंसतेस काय ? पुढल्या वर्षीं ह्याच दिवसांत, मुलगें हें असेंच कडेवर.

**पहि०**—आणि ह्या म्हातारीच्या ऐवजीं तूं वाटतें ? कर थट्टा कांहीं तरी.

**दुस०**—अग, मी येईन बरें घाबरू नकोस तूं. थट्टा कशाला ? अगदीं खरखुरें असें होणार. नाहीं झालें तर ही जीभ कापून देईन जीभ. महाराजांनीं सांगितलेंच आहे तसें.

( एक मुलगा प्रवेश करतो. पाया पडून नारळ पुढें ठेवतो. )

**मुलगा**—महाराज माझी परिक्षा उतरावी एवढा हेतू धरून चरणापाशीं आलों आहें.

**महा०**—होईल बरें परिक्षा पास. श्रीशंकरावर एकादशणी रोज करित जा. कामना सिद्ध होतील.

( एक गृहस्थ येऊन पाया पडून )

**गृहस्थ**—महाराज चरणाच्या कृपेकरून नोकरी लागली. नवस

फेडून घ्यावा. आणि मला कृतार्थ करावें. आपल्या कृपाछत्राखाल- च्यांत या दासाला लेखित्त जावा.

( दुसरा एक गृहस्थ येऊन नारळ ठेऊन पाया पडतो. )

दु० गृ०—महाराज, बढती मिळाली. तरि बोलल्याप्रमाणें नवस फेडायला आलों आहें. मान्य करून घ्यावा, आपल्या सेवक वर्गात गणना असावी या दासाची.

( आंतून एक तिसरा गृहस्थ येतो. )

ति०गृ०—चलावं महाराज उदक सोडायला. सर्व सिद्धता झाली आहे. ब्राह्मण खोळंबले आहेत.

महा०—चला, ( तिथें जमलेल्यास ) आपणहि श्रीनरहरिचा प्रसाद घेण्यास चलावें.

( जातात. पडद्यांत मंत्राचा घोष व ' हर हर महादेव. ' )

दुसरा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळ—पुणे. गणेशखिंडीतील गवर्नरचा बंगला, पात्रें—सरवुईल्यम राबर्ट, महाराज, व जाफतीस जमलेली मंडळी )

( सरवुइल्यम राबर्ट, महाराजांस आपल्या हातांनीं उच्चासनीं बसवतात. )

महा०—सरकारच्या ताबेदाराचा ताबेदार, असा मी एक यःकश्चित् मामलेदार आहे. इतक्या सन्मानास मी पात्र नाहीं.

ग०हरनर०—शेव्यशेवकभावा शंबंढानें, मी अपर्णांश पहाट नशून, आपण शर्वट्र पूज्य अहाट, टेअर्थीं मलाहि टे मान्यच अशल्यावरून, हे जे कांहीं मीं आपणा करटां करिट आहे, टे कांहींच नाहीं. ( पुष्पहार महाराजांच्या कंठांत घालतात. ) आपल्या औडार्यांदि अमोलिक गुणांच्या, सर्वांच्या मनावर पगडा बशला; टो माझ्या मन निराळा वस्टूंचा बनला हाय, अशा नाय. गुण जो हाय टो कोठेंहि अशो, आपला पगडा बशवणारच. आपण नेटिव लोकांना टो भुषण हायचा. पन् अवघे मानव चाढलावी आपले

योगानें भुषन आलेला हाय. आमी आंग्रेज लोक शांगटे, आमी इंडिया सुधारणेला आले हाय, पन ये परसंगाट, मी सांगटो, आमच्या हाटून जे सुधारणा शंभर वर्षांत होनार नाय टे येंच्या विद्यमानें डहा वर्षांत होणार. शुधारणा, सरकारच्या कुटचांवर, खाली वाग्पांडिटय करून होट नशटे. अशे लोकांना आंग्रेज लोक, कंढिबी मान डेणार नायट. जे कृति करून दाखवटाट, जे आपल्या ॲक्शननें, लोकांना सुधारटाट, आपल्या लोकांच्या रिली-जन, आयसे ढरम, कायम राखटाट, टेंयचा कल्याणाचा खरा मार्ग टेना बटाविटाट, त्यांची आंग्रेज लोक वर्शिप आय से पूजा करटे. पेशवे सरकार जशे डेशामडिल साढू पुरुषांचा परामर्ष घेट, तेशा आमीबी आंग्रेज लोक, घेण्यास चुकट नायट, हें आज मी सर्व आमच्या प्रिय रयटेस आपल्या आचरणानें जाहिर करिट आहे. पेशव्यांनीं आपल्या डुर्गुणांनीं, आपला नुकशान करून घेटला, टे बड्डल बहुट आमाला वाईट वाटत आहे. आंग्रेज लोक सुढा-रलेले हैट, त्यांच्या सुधारणेचा पेशवावर पगडा बशला, या मांडि नवल नाय. आंग्रेज लोक त्यांचा त्यांच्या धर्माप्रमाणें, सर्व रयटेला पाळटाट. टे मुळे, सर्व रयत, या अमलाखालीं खुष हाय. त्यांच्ये पुराटनचे हक्क, आंग्रेज सरकार डुबाटे नाय. सिवाय या अमला-खालीं रयटेस ज्यास्त हक्क मिळाले कारणानें रयट आनंदी आहे. आंग्रेज लोक सुधारणेवर रयटेला कशे हक्क डेटे, टे शमजणें करटां टेना आंग्रेज लोकांच्या इटिहास, आणि त्यांची विद्या आंग्रेज सरकार डेट हाय. इंडियन अथवा आर्यलोक, पहिलेच सुधारले हैट. त्यांची म्हणजे आमी सुधारणा करायची, आशातला भाग नाय. ये रहाट चक्र हाय. सांप्रत नेटिवलोकांची उटरटी कला हाय, टरिबी त्यांच्यात ये महाराजा सारखे महाटमे अवटरटाट. ये पुन्यभूमी हाय, ऐसा मी मोठ्या प्रेमाने कबुल करटो. येच्या लाभानें आमचे सुढारणेला बहुट उपयोग होणार हाय. अशा डेशा-मंडिल लोकांना, ज्या अर्थी, ईश्वरकृपेनें, टो आमच्ये कडेस हाय,टये अर्थी, चांगले रीटीने वागवावा ये आमच्या काम हाय. ये आमच्या लोकांनीं आपल्या हृदयांत नोंडन ठेवला पायज्ये. ये राज्यमद

आमाला फारसा टरास डेट नाहीं. पन ये टर खात्रीचा, अनुभवाचा वचन, कीं आमच्या पुढच्या पिढीच्या टो मानगुटिश बशनार. पन ये महाटमाचे करटा भरवलेले जिआफट दरबारांट आमचे पुढचे पिढीला आणि आटांचेलाबी मी सांगूण ठेवटो कीं, टेनी या देशचे लोकांस च्यांगल्या रिटीनें वागवला, टो व्यांत आमच्या लोकांचा व आमच्या प्रिय रयटेचावी खरा हिट हाय. आशा टे न वागवटील, टर टो आमच्या सुढारनेला कलंक हाय. ये मानवजाटला भुषण, अशे माहाराज आज ये डरबारांट मुख्य स्थानीं बसले हैट, आन् ब्येंच्या शमक्ष मी अशा शांगटो कीं, आमी सुढारलेल अंग्रेजांनीं प्रिथिमीवरचे शर्व मानव जात एक करणेच्या प्रयत्न केला पाहिजे. आन् दुसरे जो पृथ्वी सरीके लोक, चंद्र मंगळ, ट्येंच्या विचारास लागले पाहिजे. या मढिं आमाला खरा भूषण हाय. ( टाळ्यांच्या गजरांत बसतात. )

महा०—सरकारांना मी प्रथम विदित केलेंच आहे, कि या सन्मानास मी पात्र नाहीं. परंतु श्रीनरहरिचे प्रेरणेनें, जें कांहा साहेबबहादुरांनीं केलें, त्या बद्दल मी सेवकानें, आभार कोणत्या रितीनें प्रदर्शित करावें, तें या समयीं कळणें मला अवघड झालें आहे. तरि रिती प्रमाणें मी सरकारांचे आभार मानतो. ( टाळ्यांच्या गजरांत बसतात. )

( अत्तर गुलाब वगैरे होतें, हारमोनियम वाजतात. )

विनायक वासुदेवजी—लॉट साहेबांनीं इंग्रेजी रिवाजाचें स्वागत आजच्या सभारंभा करतां आलेल्या नेटिव व नेटिवेतर यांचे केलेंच. आजच्या सभारंभा मुळें, सर्व नेटिवांस फार संतोष झाला आहे. तरि ही हिंदुरिवाजाची पानसुपारी वाटण्याची मी व्यवस्था ठेवली आहे. तिचा स्विकार करून नंतर मंडळींनी रजा घ्यावी. ( पान सुपारी वाटतात. पडदा पडतो. )

( दोन गृहस्थ येतात. )

पहिला—काय ? निघणार म्हणतोस महाराज उद्यां येथून ? रजा संपली त्यांची ?

दुसरा–होय. ते आतां शहाद्यास जाणार आपल्या कामाचा च्यार्ज घ्यायला. पुणेंकरांचा आग्रह भारी, म्हणून त्यांच्या साहेबांनीं ही रजा दिली होती. बरें आहे, गुडनाईट सर.

पहि०–गुडनाईट. ( जातात. )

अंक तिसरा समाप्त ।

---

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

( स्थळ–शहादें, महाराजाचें घर. पात्रे–महादेवपंत, हरिबाई, सखुबाई, माधवराव, काळु वगैरे. )

सखु–अग आई, बसलीं आहात काय तुम्ही अशीं स्वस्थ ! दादानं आत्तां काय केलंन् तें कळलं नाहीं कां तुम्हांला ?

हरिबाई–काय झालं बाई, अशी घाबरून बोलतेस ती ? काय केलंन् दादानँ असं ?

महादेव–काय म्हणते आहेस तूं सखे ?

सखू–काय म्हणतेस म्हणजे ? घराची शोभा गेली ना ग? दादानं वहिनीला तो एक मेला बैरागडा आला होता त्याच्या स्वाधिन केली ना आतां ! तुम्ही तरि कांहीं तजविज करा आतां, तिला परत आणण्याची. दादा काय बाई अगदींच भोळे शंकर. त्या मेल्या सोळभोकानं, त्यांना बोलण्याच्या भरिस घातलं, त्यांच्या अंगावर मेला मोठ्या मोठ्यांनीं ओरडला. तरि दादा आपले शांतच. बायको सुद्धां देऊन टाकली, म्हणावें काय बाई आतां ? आई मला कांहीं बाई वहिनी आल्या शिवाय चैन पडायचें नाहीं हो. कसंसंच मेलं मन अगदीं, उदास, उदास, झालं आहे. देवा वहिनीला लवकर येऊंदे रे बाबा घरीं ?

महादेव–माधवरावना आत्तां इकडे मी बोलवतो आहे म्हणून सांग जा ! मला म्हातान्याला पहा काय आतां यातायाती त्या

अगदीं वेडगळ पोरगा होत चालला. ‘ अति शहाणा त्याचा बैल रिकामा ’ ह्मणतात तो असाच. ( कण्हतो. अ य य या. )

हरिबाई–हे आलेच माधवराव इकडे बोलवल्या शिवाय. या माधवराव, बसा असे. बाळ आहे कां घरांत ? ( सखुस ) कां कुठें बाहेर गेला आहे ग ?

सखू–अग, कचेरिंत गेला.पागोटं कसं तरि घातलंन डोक्याला. आंगरख्याचे बंद सुद्धां उलटे सुलटे बांधले. अंगवस्त्र घेण्याला विसरलाच होता, तें पुन्हां घाइनं परतून आंगावर घेतलेन् नी गेला. त्याचा तरि जीव सूचित कुठें आहे, पण करतो आपला कांहीं तरि. कचेरिंत जाताना आज इकडं आलाच नाहीं बाढतं, तुमच्या पायांवर डोकं ठेवाचंनी जायचा तो !

**महादेव**–माधवराव, म्हातारपणीं, आतां काय काय आहे हो माझ्या दैवीं पाहण्याचें ?

**हरिबाई**–पोरगं खुळावलं गे बाई माझं ! कोणा तरि मेल्या चेटक्याचं हें काम आहे, मी खास सांगते अगदीं. तरि मी रोज दृष्ट काढते, माझ्या बाळाची, याला दृष्ट पडूं नये कोणाची ह्मणून. मला रोज मोठी भिती वाटे कीं, असं कांहीं तरि याचं कधीं होईल. चांगली गोजिरवाणी मुलं, चांगल्या गुणाची मोठालीं माणसं सुद्धां या चेटक्यांना पाहवत नाहींत. मेल्यांचें जगांतून निसंतान कसं नाहीं होत ? ( बोटें मोडते. )

**माधवराव**–मला सुद्धां बाईसाहेब गेल्या पासून, चैन पडत नाहीं आहे. काळुला मी त्या बैराग्याच्या मागोमाग रवाना केला आहे.

**महादेव**–काळुला पाठवला आहांत ! हें एक बरें केलेंत. आपखुषीनें ह्या पोरट्यानं त्या बैरागड्याच्या तिला स्वाधिन केलीना ?

**माधव**–हें काय विचारतां हो ? एरवीं त्या तशा जात्या ? आणि तो बैरागी तरी नेतां का ? तो नेत नव्हताच, पण महाराज ह्मणाले, मीं संतोषानें ही अर्पण केली आहे; तरि हे साधो, तुम्ही हिचा स्विकार करण्यास स्वतःस मुळींच अनुमान वाटूं देऊं नका.

सखू–काय मेला. तांबडेलाल डोळे करी तो बैरागी ओरडे तेव्हां.

माझ्या अंगाचा थरकाप होइ. मेला हा राक्षस, आतां दादालान् बहिनीला मारतो कि काय, असें सुद्धां एकदां मला वाटलें !

**माधव**—कडक; तामसी भारी. प्रथम ह्मणाला आटा दे देव, आटा दिला. चावल दे देव, चावल दिले. लकडी दे देव लकडी दिली. घी दे देव, घी दिलें. डाळ दे देव, डाळ दिली. मग बोले वस्त्र देदेव, वस्त्र दिलें. बासन दे देव बासन दिलें. जें मागे, तें महाराज देत सुटले. आणि ह्या मागत सुटला. शेवटीं ह्मणाला तेरि लुगाई देदेव, तेव्हां बाईसाहेबानां पुढें उम्या केल्या त्याच्या आणि विचारलें महाराज, आणखी काय पाहिजे ? तेव्हां तो रागावला. मग त्याची समजूत घालून, महाराजांनीं बाईसाहेबास सांगितलें कि, तुझा आणि माझा ऋणानुबंध असेल तर गांठ पडेल. मी ह्या बेरागी बावांच्या तुला स्वाधिन केलें आहे. त्यांना शिवस्वरूप मानून, त्यांची मजप्रमाणें सेवा करित जा. त्यांना वाईट वाटेल असें कांहीं करूं नको बरें ! ते माझ्या पेक्षां जास्त चांगल्या रितीनें तुला वागवतील. तुला वाईट वाटूं देऊं नकोस. तूं माझी आजपर्यंत जी सेवा केलीस, त्याचें हें आज तुला फळ मिळत आहे असें समज. आणि गहिंवर दावीत महाराज बाईसाहेबांना जा ह्मणाले.

**महादेव**—एकंदरीत असें झालें तर ? तो बैरागी प्रत्यक्ष शिव तर नसेल ?

**सखू**—बाबा, शिव कसला तो ? मेला दांडगा होता एक बैरागडा.

**महादेव**—अग, त्याची लहानपणची वृत्ति आहेना तुला माहित ? देवावर, साधुसंतावर श्रद्धा त्याची अतोनात. आणि जें कोणी कांहीं मागेल, तें त्याला द्यायचें हा कायतो छंद. तशाच त्याच्या लहानपणाच्या खोड्या तरि ह्या अशाच. नेहमीं, आपल्या बरोबरीच्या शाळेंतल्या पोरांना कागद दे, शाई दे, लेखण्या दे, आपण आपला पुन्हां रंक. पुन्हां घरीं आला कि नवी तयारी करून द्यावी लागे मला. बरें विचारलें तर नाकबूल जायचा नाहीं. शांतपणें सांगायचा कि अमक्या अमक्याला जरूर होती, मग मी दिलें त्याला बाबा—तेव्हांच मी याचें भाकित केलें होतें.

**हरिबाई**–एक दिवस लहानपणीं, ह्मणजे देव देव्हाऱ्यांतला नाहींसा केलान् नाहीं, असें व्हायचंच नाहीं. एक दिवस तर, नरसोबाची मूर्ती देवांतली गेली खेळायला याच्या बरोबर. पहातें तों चालली आहे पूजा तिची. कांहीं विटकरा, धोंडे, दगड मांडून. लहानपणा पासून, हें त्याचं अस्सं चाललं आहे. बरं आतां पुढें कसं करायचं माधवराव ? कांहीं युक्ति काढा तुह्मी !

**माधव**–मी स्वतः जातों हवा तर, त्यांच्या शोधा करतां. मला नाहीं वाटत कीं तो बैरागी बाईसाहेबांना घेऊन जाईल असं. तो होऊनच पहा परत त्यांना येथें आणून पोंचविल.

**महादेव**–पण माधवराव, असें ह्मणून स्वस्थ तर बसतां येत नाहींना ? भला असला तर करिल तसं–

**सखू**–कसली मेली या बैरागड्याची भलाई !

**माधव**–मी जातोंच. ( कानोसा घेत ) बाहेर गलबला कसला आहे ? ( बाहेर येऊन ) बाइसाहेबांचा शोध लागल्या शिवाय, आज अन्न घ्यायचें नाहीं.

( काळु येतो )

**काळु**–चिभन लोक बघा कस हायती. रिकमटेकड गवगवा करित सुटल्याति. फलान्यान् आपली बाईल बिस्तान्याला दिली, पन् मी ह्मगतो, ह्मास्नि घरचा खाऊन, या दुसऱ्याच्या उठाठेवी पाह्यज्यत कशाला ? चिभन् उगिच इवळत्यात. गागत्यात, आन् त्या बैरागड्याला शिंयाबी द्येत सुटत्यात. समद्या गावामंदी, येच काहूर माजून राह्यलया. रस्त्यामंदि बघा जो भेटला तो, ‘ ह्ये कसं काय झाल पुढें काय व्हनार ’ म्हून इचा इचारून मास्नी अक्शी बेजार केलया. आपुन थतन् मारल त्वंडाला टाळं, त्ये आत्तां उघडतुया. चिभन येना इचाराय काय व्हतया, काई सरम पडत्यात? सकालपून पघा ह्यो तिसरापार झाला, पोटामंदी कसं कावळ कोकलत्यात. कंबर मोडलीबी त्या बैरागड्याचा पाटलाग करूनशान. ( माधवराव येतो. )

**माधव**–कायरे काळू ? काय झालें काय शेवटीं ? असा उदास कां ? बाईसाहेब–

**काळू**–बाईसाहेबांशिवाय ह्य त्वांड तुमास्नि दावावं कस, असंबी यकदा मनांत आलं व्हतं, आन ह्यो जीव अक्शी कटाळला, तवा बगा, वाटतल्या नदिमंदिच ध्येनार व्हता इश्रांती. पन कशा- मुळं ते समजत नाय झना, पन बाईसाब परत येनारच, अस बगा हे मन अक्शी सांगायास्नी लागलं. महाराजांच्या पायांच्या पुन्याइन–

**माधव**–अरे पण तूं त्यांच्या मागोमाग गेलास तर झालें काय काय तें तर सांगशिल? त्यांना मध्येंच सोडून तर नाहीं आलास ?

**काळु**–माधोरावदादा, ह्यो काळु ज्येचं आन खातो त्येचं अस अर्धवटच काम करिल असा वाटत कां तुम्हास्नि ? हतुन त्यांच्या मागोमाग तुह्मां साम्नेच निघालो, त्यो बघा आठ कोस त्यांचं मागं ग्येलो. वाटमंदी नदी आली आडवी, तवा त्या बैरागड्यास्नि, आन आपल्या बाईसाहेबास्नी गुडगा गुडगा पानी. अन चिभन मी बघतुया तो पान्यास्नि अंत नाय. मंग ग्येलो हात मारित पल्याड. आन पघतां पघतां दिली यकाकी गिरकांडी न काय त्या बैराग्यान? तवा पघा भरमिटा सारखं मागंबि पाह्यलं, ह्योर पाह्यलं, समद्या बाजूला धावत सुटलो. पन त्येचा कसचा पत्ता लागतो. पुन्हा ह्यंगालो मनांत, बाईसाब तारि हत कुठं आढळत्याल. म्हून मोठ्या मोठ्यानं पिसाळल्यावानी सादाबी मारल्या. पन थत कोन ओ देतुया रानांत ? दमलो दमलोन् चिभन रडच एकदम कोसळलं मास्नि. त्या मावलीचा सुमरण झालं, समद्या जलमाच्या कथा आठवल्या आन तुमास्नी सांगितला त्यो इचार केला व्हता, पन तुमास्नी सांगतो, देवाच्यान् तो सादा बैरागि न्हायच. कोनी तारि परमेसराचा अवतार हाय–

**माधव**–सगळें खरें, पण काळू, आज बाईसाहेब आल्या शिवाय मी अन्न घेणार नाहीं, असा नेम केला आहे. आणि तूं तर असें ह्मणतोस ?

**काळू**–तुमच्या मनामंदि काय मी खोटं सांगतो व्हय ?

**माधव**–खोटें नाहीं रे, तुझ्या विषयीं माझी खात्री आहे. पण आतां पुढें युक्ति काय करावी ? ( पडद्यांत गलबला होतो. )

**काळू**–इचिभन ह्य लोक उगिच गागरयात. आमच जीव

हकड घोरांत पडस्याती. आन ह्यंच्या चाललयाति चवकशा. ( हळक्यास्वरानें ) आपल्यास्नी कायबी युगत सुचत नाय अशा परसंगात. स्यो देव आमच्यावर काय कुर्पा करिल ती खरी. ( एक गृहस्थ येतो. )

**गृहस्थ**—( माधवरावास. ) कोण ? माधवराव ? आनंदाची खबर आणली आहे तुम्हांला. बाई साहेब वैराग्याच्या हातून सुटून—

**माधव**—}
**काळू**—} काय आल्या म्हणतां ?

**गृहस्थ**—होय आल्या.

**काळू**—हत गावांत ?

**गृह०**—गांवांत आल्या बाबा, गावांत आल्या. ( माधवरावास ) ह्या मनुष्यास हर्षवायू होईल. संभाळा—नागरिक स्त्रियांचें ज्यांच्या भोंवतीं वलय आहे, अशा तुमच्या बाईसाहेब लवकरच तुमच्या दृष्टीस पडतील. ( जातो. )

**माधव**—चला काळू, ही बातमी आपण घरांत कळवूं. ( सखु येते ) ताईसाहेब, आनंदाची वार्ता, आमच्या बाईसाहेब आणि तुमच्या वहिनी आल्या.

**सखू**—( हर्षानें ) खरं कीं काय ?

**काळू**—खरं किं काय म्हंजे ? खोटं न्हायच व्हायचं. आमी ही खबर बाबासाबास्नी आन आईसाबास्नी देतो. तुम्मी व्हा होवं तर म्होर बाईसाबास्नि भेटाया.

**सखू**—ही मी जातेच. ( सुंदराबाई व कांहीं स्त्रिया येतात. एकदम सुंदराबाईकडे धांवत जाऊन ) अग वहिनीअ—मला एकदां कडकडून भेट अगोदर ! ( भेटतात. )

**पहिली**—पहा, ह्या दोघींची बिचाऱ्यांची कशी भेट होतांक्षणीं दशा झाली ती. गहिंवरानें कंठ दाटल्यामुळं, एकमेकींकडे चित्रासारख्या पहात आहेत. तोंडांतून शब्द कांहीं निघत नाहीं.

**सखू**—( स्फुंदत ) वहिनी, त्या मेल्या बैरागड्याच्या हातून कशी सुटलीस तूं ?

**सुंदरा**—( स्फुंदत ) वन्सं, काय हे माझे धिंडवडे ! मला कांहीं

त्याच्या बद्दल वाईट वाटत नाहींहो. पण ह्या लोकीबायका काय म्हणत असतील हो आपल्या मनांत ?

सगळयाश्त्रिया—तुम्हीं अगदीं खंती होऊं नका बरं ! तुम्ही काय केलेंत् यांत तर तुम्हाला लोक वाईट म्हणतील !

एक स्त्री—( सुंदाबाईचे डोळे पुशित. ) पुसा डोळे. उगिच वाईट वाटून काय बरं घ्यावं ? चला घरांत आधीं, त्या सासु सासऱ्याच्या दृष्टिस पडा. त्यांचे जीव कसे टांगणीला लागले असतील बरें ! ( तिला घरांत नेतात हरिबाई, माधवराव काळू आहेत असें दिसतें. ) आतां पहा कसं, आनंदानं घर गजबजायला लागलें.

हरिबाई—( पाहून ) बाळे सुनबाई आलीस कां ? आधीं मला भेट माझे बये ( भेटतात. )

महादेव—त्या ईश्वराला करुणा आली आमची. विघ्नकर्ता आणि विघ्नहर्ता तोच आहे. भक्तांचें सत्व पहातो तो. ( सुंद्रेस ) बाळे, कांहीं वाईट वाटून देऊं नको बरें !

माध०—आईसाहेब, बाईसाहेब, आतां गहिंवर आवरावा हें चांगलें!

हरिबाई—माधवराव, आम्हांला गहिंवर आवरायला सांगतां, आणि तुमचा कंठ कशानें इतका दाटून आला हो ? तुम्ही सुद्धां आतां—

काळू—चिभन रडण्या मंदि या लई गोडि लागती आतां !

सखू—( सुंदराबाईचे डोळे पुशित. ) वहिनी, आतां रडण्याचं सर्वांनीं पुरे करा. त्या बैरागड्याच्या हातून कशी सुटलीस तें सांग बघूं. !

सुंदरा—अहो, त्याच्या स्वाधिन मला केलं, आन् मी जिवाची आशाच सोडली. तो नेईल तिकडं त्याच्या मागोमाग गेलें. पुष्कळ दूर दूर नेलन्, मागें पाहू नकोस म्हणाला, मी कांहीं पाहिलं नाहीं मागं. मला सांगणं झालं होतं, जसं हा बैरागी सांगेल तसं वागायचं. पुष्कळ पुष्कळ लांब त्या नदीच्या पलिकडे नेल्यावर, मला एकदम म्हणाला चल—

सखु—, हरी— } मग?

सुंद०—मीं म्हटलं चाल्लेच आहे.

**महादेव**–मग काय म्हणाला ?

**सुंद०**–ओरडून म्हणाला, चल तयार हो.

**सर्व स्त्रिया**–घाबरल्या असाल मग तुम्ही ?

**सुंद०**–मुळींच नाहीं. त्या वेळेला माझी भिति बाई कुठच्या कुठेंच गेली होती. मी म्हटलें तयार आहे, मार एकदांची ठार मला नी सोडव.

**सखु**–मग?

**सुंद०**–मग मेला जें म्हणाला, तें ' शिव शिव ' मी तोंडानं सुद्धां उच्चारूं नये.

**सखु**–कांहीं चहाटळपणा करायला लागला असेल मेला.

**सुंद०**–नाहीं. तसा तो दुरूनच बोलत होता. पण मग म्हणाला तूं माझी बायको झाली आहेस. तुझ्या पतिनं तुला, मला अर्पण केली आहे; तर आतां उशीर लाऊं नकोस. असं म्हटल्यावर त्यानं, मग माझं पित्त खवळलं. म्हटलं मेल्या, तुझ्या नावानं डोकं फोडून प्राण देईन. तर म्हणाला दे. आन जवळ यायला लागला, तेव्हां त्याला दटावलं, आन पतिव्रतेच्या शापानं काय होतं, त्याची आठवण दिली. तसं मग बाई, त्याचं त्यालाच काय वाटलं, माझ्या पायांवर डोकं ठेवलं, आन मातोश्री क्षमा करा, चुकलों असें म्हणाला पुष्कळ. आणि मला डोळे मिटायला सांगितलेन्. मग लागलीच डोळे उघडून पहाते तों, या आपल्या गांवच्या वेशी जवळ उभी आहे; आणि बैरागी बिरागी कोणी नाहीं जवळ !

**सखु**–मग तुला फार वाईट वाटलं असेलना त्याला वाईट बोलल्या बद्दल ? अग वहिनी तो देवच ग देव ! ( पाणक्या येतो. )

**पाणक्या**–बाईसाहेब चला, पाणी उपसलें आहे.

( माधवराव व काळू शिवाय सर्व जातात. )

**माधव**–काळू, तूंहि जा जेवून घे. सगळा दिवस तुला आज उपास पडला जा. ( काळू ' जी ' म्हणून जातो. ) मी आतां महाराजांना ही बातमी कळवायला जातो. अझून महाराज आले कां नाहींत आज ? ( जातो. )

पहिला प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश २ रा.

( भिक्षुक येतात. )

**द्वैपायनभट्ट**—अहो दुर्वासभट्ट, त्या अक्षता कुंकुममंडित केल्यात नीट ? हं घ्या हे ( दर्भ देतो ) पवित्रकें करा बरें एवढी ! बाळ नारुभट, पाट मांडलेस ? हा गुलाल घे. आणि तेवढ्या भागाला चौकोनी पट्टा ओढ.

**दुर्वा०**—नाऱ्या कपाळाला भस्म नाहीं तुझ्या ! किती वेळ सांगितलें तुला ? ( चापट मारून ) आणि शेंडीला गांठ दिली असतीस तर आई मेली असती वाटतें तुझी ?

**जमदग्नि०**—( चापट मारून ) हा आमचा गोप्या तरि असाच. संध्या केली होतीस का घरून येतांना !

**गोपाळ०**—कांहीं तरि काढून आमच्या बाबांना, धोपटायला पाहिजे कुठुन तरि मला नाहीं तर आईला. मोठ्यामोठ्यानें घडघडीत संध्या आईच्या देखत म्हटली तरी—

**जमदग्नि०**—चुप. चुप. कुठें काय बोलावें तें रांडलेंकाला समजत नाहीं ( धोपटतो. आंतून जमदग्निभट, अशी हाक येते. )

**आचार्य**—( पुढें येऊन ) अहो, तें आसन, तो चौरंग मांडला कां ? अभिषेकपात्राची योजना केली ?

**जमदग्नि**—( गडबडीनें चौरंग वगैरे मांडून ) तयारी आहे आचार्य.

( मंजूळा व कोकिळा मुली येतात. )

**कोकिळा**—( मागून येत ) मंजूळे, तूं आपलीं फुलें कुणाजवळ दिलींस ?

**मंजू०**—ती फुलांची टोपली दिसत नाहीं का, तिच्यांत टाक हो !

**कोकिळा**—दिसली हो. ठेवते त्यांत. ( एका भिक्षुकास ) हें गंध उगाळून आणायला सांगितलं होतं, हें कुठें ठेवायचं भटजी ?

**दुर्वास०**—मुली, ठेव तें इथें. समया पाहिजेत इथें. कोण येत आहे घेऊन ?

**कोकिळा**–मोठमोठ्या बायका निघाल्या आहेत यायला. त्या येताहेत घेऊन.

**मंजुळा**–( कोकिळे जवळ जाऊन ) कोकिळे, आज इथं काय होणार आहे माहिती आहे तुला ?

**कोकिळा**–हो. मला सांगितलाय माझ्या आईनं. काशीहून गंगेच्या कावडी रामेश्वराला घालणारा एक ब्राह्मण आला आहे. तो आज महाराजांवर, त्यांनें आणलेल्या कावडीनं अभिषेक करणार आहे हो.

**मंजू०**–त्या पाहिल्यास बायका हातांत फळांच्या आणि मिठाइच्या पडर्या घेऊन इकडे येत आहेत. जसं कांहीं लग्नाचं रुखवतच.

**कोकि०**-ती पाहिलीस, मंजूळे तुझी आई. ही नथ कधीं केलीग तुझ्या आईला ?

**मंजुळा**-ती मी घालून बघीतली होती कोकिळे. पर्वांच केली नथ शेटिनं. ती बघीतलीस तुझी आई ! सगळ्यांच्या मागे आहे. ( स्त्रिया प्रवेश करून समया भडजी जवळ देतात, व बाजूला उभ्या राहतात. )

**आचार्य**–दुर्वासभट्ट अजून तें अभिषेकपात्र नाहीं ना टांगलें ? ते पहा महाराज, आणि ते कावड खांद्यावरून घेऊन आपले यजमान आले सुद्धां.

( गडबडिनें दुर्वासभट अभिषेकपात्र टांगतो. महाराज व कावडवाला येतात. )

**आचार्य**–( पुढें होऊन महाराजांस हातानें धरून ) या आसनावर स्थित व्हावें. ( महाराजांस बसवतो. कावडवाल्यास ) आपण इथं असे बसा. ( बसवतो. )

( महाराजांच्या स्त्री पुरुष पाया पडतात. महाराज आशिरवाद देतात. )

**कावड०**–महाराजांनीं माझा एवढा मनोरथ पूर्ण केला, म्हणजे मी कृतार्थ झालों.

**महा०**–भूदेवा, आपली काय भावना असेल ती खरी, पण मी यःकश्चित्त मनुष्य आहे.

**कावड०**–ज्याच्या चरणाचा रज, आपल्या मस्तकास लागावा, म्हणून प्रत्येक मनुष्य, मग तो नास्तिक असो वा आस्तिक असो, मनापासून इच्छा करित आहे, त्या मानवस्वरुपी श्रीदत्ताच्या अवतारावर माझी पूर्ण भावना आहे.

**महा०**–मला वाटतें, या पेक्षां आपण श्रीदत्तात्रयावर अभिषेक कराल तर जास्त श्रेयस्कर होईल. मानवांपेक्षां देव स्तुतीला अधिक पात्र आहेत. आपण जी माझी स्तुती केलीत ती नृसिंह-चरणींच असो.

**कावड०**–महाराज कृपानिधे, मला स्वप्नांत प्रत्यक्ष श्रीरामेश्वरानें सांगितलें आहे कीं, मी यशवंतराय या नांवानें, भूतलावर अवतार धारण केला आहे तरि ही तुझी बारावी कावड त्या महापुरुषावर नेऊन घाल, म्हणजे ती मला पावेल.

( "ऐकलेंत का दुर्वासभट्ट" म्हणून द्वैपायनभट्ट म्हणतात. सर्व भिक्षुक 'ऐकलेंत' असें खुणावतात.)

**महा०**– ( हंसत ) स्वप्नावर सुज्ञ पुरुष बेताताच भरंवसा ठेवतात. मनांत जें घोळत असतें, तेंच बहुत करून स्वप्नांत दृष्टिस पडतें.

**कावड०**–दयानिधे, कां सेवकाचा अंत पाहतां ? काशीहून कावड घेऊन निघालों, तों अर्ध्यावाटेंत, सातपुडयाजवळ शितज्वरानें गाठलें. आणि आतां माझी पाप्याची बारावी कावड रामेश्वराच्या मनांतून घ्यायची नाहीं असें वाटलें. आणि देवाच्या निर्दयत्वा बद्दल त्याला दोष दिला. परंतु रात्रींच पहातों, तों स्वप्नांत गौरवर्ण, भस्मचर्चन केलेला, शुभ्र वस्त्र परिधान केलेला, हातांत पळी पंचपात्री, त्यानेंच मला सांगितलें कीं, यशवंतराय महादेव मीच आहे. ( आंत शिंग व बाजत्रीं वाजतात. )

**आचार्य**–हे वाजंत्री आले. चला करा आरंभ–ॐकेशवायनमः–
( नंतर महाराजांवर विधीयुक्त रुद्र म्हणून अभिषेक होतो. )

प्रवेश दुसरा समाप्त.

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळ—शाहादें—अशबर्नर, अर्स्किन, शिरस्तेदार वगैरे. )

अशबर्नर—शिरस्टेडार, ( महाराजांची यात्रा पाहुन ) ये क्या डंगल है ? इटके लोक जमून काय हेटू हाय येंच्या ? काय मांगना हाय येंचा ? मला वाटतो, ह्ये टालुक्याटले समडे लोक ये मामलेटडाराला टरास डेयाला एकट् जमले हायट-

शिरस्तेदार—ही रावसाहेबांची यात्रा आहे. त्यांना आमचे लोक देव मानतात.

आर्स्किन—कुछ मंगटा नयी ये लोक. मामलटडारची जटा हाय. मामलटडार ये कामा मंडी पडले, टे मुळें सरकारी कामाला नालायक होट चालले हायेट. क्या शिरस्टेडार ?

शिर०—हें नजरेनें पाहतच आहेत आतां साहेब.

अशबर्नर—जट्टा हाय, टो अझून कशी मामलटडारक छोडते नहीं ?

शिर०—एक शिपाई पाठवावा तिकडे, म्हणजे तो तशी व्यवस्था करिल.

अश०—( पाहत ) कुछ कारन नहीं. ये डेखो मामलटडार अलग झाला. ( अर्स्किनास ) देखो, कैसा इनका चेहरा शांट मालुम पडता है.

आर्स्किन—शांट हाय, लेकिन सरकारी कामका नहीं हाय.

अश०—टे टो सच्या होगा. लेकिन ये आपने लोगमें होटा टो दुसरा जेसस खाईस्ट है. ये शांट और गंभीर मुडासे, जेससची कल्पना बराबर आती.

आर्स्किन—नेटिव हाय ये.

अश०—कुछ फिकीर नाय. टोपी निकालो. ( महाराज येतात त्यांस सलाम करतात. )

अश०—क्यं मामलटडार, इतनी जट्टा कायकु रखटे टुम ?

महाराज—साहेब, लोक आपल्या खुषीनें माझ्या मागें येतात. येऊं नका असें माझ्यानें त्यांना म्हणवत नाहीं. सरकारी कामांत हे

लोक मुळीच त्रास देत नाहींत. होईल तितकी मदत करणारे आहेत. ही साहेबांची खात्री असावी.

**आर्स्किन**–टेंची मडट तुमाला कशाला पाहिजे ? टुमच्या कामामंडी त्यांची मडत घ्या, अशा शरकार टुमाला शांगटो ?

**महा०**–साहेब,रयतेच्या मदती शिवाय सरकारी काम होऊं शकेल खरें, परंतु मला वाटतें, राजा व प्रजा एकदिलानें जितकें काम करतील, तितकें दोघांसहि सुखावह.

**अश०**–टे आमाला पायजे नाय. टुमचा वय झाला, आटा टुमी खुषीनें पेनशन घ्यावा.

**महा०**–सरकारचा मी ताबेदार आहें. त्यांच्या मनांत पेनशन द्यायचें असल्यास ते समर्थ आहे. परंतु असें करण्यास कृपाकरून, योग्य कारण काय तें दाखविलें तर बरें होईल.

**अश०**–योग्य कारनबी टुमाला कळवण्यांत येईल. बरा टो न्हाउंद्या. ऑफिसरेकर्डची पहिले इन्स्पेक्शन आयसे टपाशणी झाली पाहिजे. ( सर्व जातात. )

( दोन कारकून येतात. )

**पहिला का०**–पाहिलेंत, लायसन्स टाक्सचें काम महाराजांनीं इतकें चांगल्या रितीनें बजावलें, त्याचें हें फळ ! रावसाहेबांच्या हद्दींतील, कायतीं तेरा अपिलें तक्रारिची वर गेली. ह्मणजे इतर तालुक्यांच्या मानानें कांहींच नाहींत. तरि आपलें आहेच पेनशन घ्या ह्मणून साहेबांचें ह्मणणें.

**दुसरा०**–पेनशनांत बहुधा काढणार नाहींत रावसाहेबांना. जेव्हां सर्व मामलेदारांची कमेटि भरली होती, त्यांत मुलकी व गर्दी कामाची व्यवस्था कशी करावी, ह्या विषयीं रावसाहेबांचें मत पसंत होऊन, त्या प्रमाणें व्यवस्था कायम झाली. अशाला—

**पहि०**–अशालान तशाला काय ? " आलें देवाजीच्या मना, तथें कोणाचें चालेना " साहेबांच्या बोलण्यांत किती निश्चय होता तो पाहिलास ना ?

**दुस०**–पाहिला. पण खरोखर सांगतों, तसें झालें तर फार

वाईट होईल. किती दयाळु स्वभाव रावसाहेबांचा! कोणाला लागेल असा शब्द आपण तर नाहीं बुवा त्या मुखांतून ऐकला !

पहि०–अरे रावसाहेबांच्या या स्वभावाची, एक तुला गम्मत सांगतों. गेल्या हफ्त्याच्या वेळेस नोटिसा काढायच्या होत्या, तें काम कांहीं मजकडे आलें; एक नोटिस मी फार जरबेची लिहिली होती. रावसाहेबांचें तुला माहितच आहे, आळस कसा तो त्या पुरुषाला ठाऊकच नाहीं. नाहीं तर पुष्कळ मामलेदार असतात, वाचल्या सवरल्या शिवाय कागदावर ठोक सही, हा त्यांचा धंदा. महाराजांनीं ती नोटिस वाचली. त्यांना रुचली तर नाहींच. बरं, आतां मलाहि वाईट वाटतां उपयोगी नाहीं, म्हणून केली काय मजा त्यांनीं, बाळू म्हण शाई उपडी केली त्या कागदावर. आणि दुसरी मग मनासारखी नोटिस लिहिली स्वतां.

दुस०–अरे तें कशाला ? कारकुनाला कधींही धमकावून सांगितलें नाहीं, टाईमशिर या तुम्ही म्हणून ? नाहींच कदाचित् कोणी वक्तशिर आला, तर त्यांचें काम आपण करून घेत. मग तो दुसऱ्या दिवशीं करतो कशाला उशीर ?

पहि०–पद्धतच कामाची वळणशिर. बरें चला. बोलत काय आपण उभे राहिलो ! त्या बारनिशा व्हायच्या पडल्या आहेत ना ? चला. ( जातात. )

प्रवेश तिसरा समाप्त.

---

## प्रवेश ४ था.

( स्थळ–शहादे–कचेरी. महाराज एकटेच येतात. )

महा०–( स्वगत ) शेवटीं कमिशनर साहेबांनीं आपलें तें खरें केलें. किती दिवस त्यांच्या मनांत हें पेनशनचें प्रकर्ण घोळतच होतें. पेनशन दिले त्या बद्दल मला मुळीच वाईट वाटत नाहीं. पण सरकारी कामाला, वय होऊन गेलें, अतएव नालायक, असा जो शेरा आहे, त्या बद्दल माझी तक्रार आहे. सरकारी काम आज तागायत कसें केलें, तें दिनदुनियेला माहित आहे. आणि या

साहेबालाहि तें माहित नाहीं असें नाहीं. पण निव्वळ हा अधिकाराच्या तोऱ्यांतला हट्ट आहे. मी सरकारी कामाला अजून लायक असतां, मला कां पेन्शनांत काढलें, याचें जों पर्यंत मला खरें कारण दाखविण्यांत येणार नाहीं, तों पर्यंत माझ्या मनाचें समाधान होणार नाहीं. " राजा प्रकृति रंजनार्थ " राजानें प्रजेचें रंजन करित, तिचें पालन केलें पाहिजे. तिला दुःख होईल, अशी राजानें कोणतिहि गोष्ट करणें, म्हणजे तें राजत्वाचें चिन्ह नव्हे. खरा प्रेमळ पति आपल्या पत्नीस आनंदविण्यांत जसा नेहमीं गर्क असतो, तसेंच राजानें प्रजेच्या ठायीं असलें पाहिजे. या कामीं व्यापारी धोरण मळींच शोभायचें नाहीं. राजनीतीचें खरें उत्कृष्ठ धोरण कोणतें, तें आमच्या सरकारास, आज पर्यंतच्या मी आपल्या कृतीनें दाखवलें आहे. पण तें त्यांना पसंत आहेसें दिसत नाहीं ! श्रीनृसिंहाची मर्जी. ईश्वरानें निर्माण केलेले हे अनावर षड्रिपू मलाहि कधीं कधीं त्रास देतात. त्यांना मी दाबांत ठेवतों, म्हणून ते बाहेर उसळलेले कधीं दिसत नाहींत. पण अडवून धरलेला घोडा, जसा जागेवरच थयथयाट करतो, तसे तेहि मला मानसिक त्रास मधून मधून द्यावयास चुकत नाहींत. ज्या मनुष्याला योग्य स्वाभिमान, कुलाभिमान, जात्याभिमान, देशाभिमान नाहीं तो आणि पशु यांत अंतर काय? जर मला पेनशनांत काढण्याचें खरें कारण दाखविण्यांत येत नाहीं, तर मी पेनशन कां घ्यावें? सरकारला फुकट खाऊन कां बुडवावें? निदान सरकारनीं मजपासून एक महिनाभर पुन्हां काम घ्यावें ! आणि मग मी होऊनच पाहिजे तर राजिनामा देतों. पण हें साप साप म्हणून भुई धोपटणें, आपल्याला साफ खपायचें नाहीं ! आतां ह्याच अर्थाचा सरकारांत एक अर्ज गुजरतो. ह्या रुपेरी बिडीतून सुटल्यामुळें, मला मनापासून आनंद होत आहे. तरि कर्तव्य म्हणून मला हें सर्व केलें पाहिजेच.

( पडदा पडतो. )

अंक चवथा समाप्त.

---

# अंक ५ वा

## प्रवेश १ ला.

( स्थळ–संगमनेर, सब रजिस्ट्ररचें घर. पात्रें–महाराज पलंगावर निजले आहेत, सुंद्राबाई पाय चेपित आहेत असा पडदा उघडतो.)

**सुंद**०–आतां मी कुठें जाऊं द्यायची नाहीं हो ! जीवाला मेला थोडा का त्रास होतो आहे ? पण त्याचें इकडे कांहींच वाटत नाहीं. बरं कुणी सांगितलं दुसऱ्यानं, तरि ऐकायचं नाहीं. हा आला याच्या बरोबर जा, तो आला त्याच्या बरोबर जा, असें सर्वांच्या मनाजोगतें करून,–( पायांला हात लावून ) मेलं लोकांचं पाप हें अझून भोगावं लागतं आहे. कित्ती दिवस झाले तरी सूज पायांची आपली जशीच्या तशी. आतां कुठें दोन दिवस कांहींशी ओसरली आहे. पुन्हां लोकांची गर्दी होणारच सूरू. पण मी अगदां साफ सां-गायचा बेत केला आहे कि, दर्शन कोणाला घ्यायचं तर त्यानं दुरून घ्यावं. दुरून घेतलं तरि दर्शनच. मग जवळ अगदीं खेटून पायांवर आपलं डोकं ठेवण्यांत काय अधिक आहे ? आपल्या डोक्यांतलीं पापं लोकांना कां तीं भोगाला लावायचीं ?

**महा**०–प्रिये, उगिच कां जिवाला त्रास करून घेतेस ? भोग हा देवादिकांना सुद्धां चुकला नाहीं. आपला भोग समजून, सुखानें तो भोगण्यास तयार राहिलें पाहिजे. श्रीनृसिंह जसें ठेवील तसें राहिलें पाहिजे. त्याच्या मनांत येईल तर एका घटकेंत, भोग नाहींसा होईल. त्याची कृपादृष्टी मुख्य पाहिजे. मला या भोगाचें कांहीं सुद्धां वाटत नाहीं. त्याची कृपा असली म्हणजे पुरे. मग असले भोग सत्राशें असले तरि चिंता नाहीं.

**सुंद**०–इकडं चिंता आहे कसली नाहीं तरी ! सगळी त्या देवालाच चिंता ठेवावी लागते आहे इकडची ! बरं नाहीं चिंता म्हणावं, तर सगळ्या दुनियेची आहे. आधीं लोकांचं बरं झालं, म्हणजे मग आपलं. आपलं कांहीं झालं तारे काळजी नाहीं.

म्हणायचं भोग देवाला चुकला नाहीं, मुद्दाम आणायचा आपल्या हातांनीं भोग, तेथं देव तरि काय करिल ? कितीक वेळा बिचाऱ्यानं आमच्या करतां धावावं ? तें कांहीं नाहीं. लोकांचं पाप नको काहीं भोगायला आपल्याला बरं का ? ऐकलं ना ? हो म्हणावं. म्हणजे मला खरं वाटेल. नाहीं तर मी सांगेन दुरून दर्शन घ्या म्हणून, आणि इकडून सांगणं व्हावं, किं " येऊद्या बरं जवळ येऊंद्या कोणाला असें तोडून बोलूं नये " म्हणजे पुन्हां आपली वाईट मी.

**महा॰**—अग, तुला वाईट म्हटलें कोणी ? कोणी तुला वाईट म्हणत नाहीं. तुझें तूंच आपल्याला वाईट म्हणून घेत आहेस. लोकांचं पाप आपल्याला भोगायला नको म्हणतेस, ते लोक ते कोण आहेत इथें ? जगांतलीं हीं सर्व माणसें खेळायला आली आहेत, म्हणून कितीदां बरं सांगितलं तुला ? त्यांत लोक काय मानायचे, आणि मी तूंपणा राहिला कुठें ?

**सुंद॰**—पण बाई, हे पायाचे खेळ होतात, म्हणून म्हटलं हो. आपल्याला तें सोसवतें, मग माझं काय बाई त्यांत जातें ? ( पाहिल्या सारखें करून ) मी जवळ असलें, तरि मंडळी आपली खुशाल येऊन बसतात इथं. त्यांना कांहीं वाटत सुद्धां नाहीं. इकडच्या दरबारांत मज्जाव नाहींच कोणाला. मलाहि आतां त्याचं कांहीं वाटत नाहिंसं झालं आहे सवयीनें ! सखारामबापु येत आहेत वाटतं इकडे ?

**महा॰**—कोण बापू ? खुर्ची आहे ना तिथें ?

**सुंद॰**—आहे , त्या गादिच्या खुर्चिवर बसतील ते. पण खरंच, आज ते सारखे चार वर्षे झालीं, पाठीस लागले आहेत, तर कां नाहीं जायचें मनांत येत, त्यांच्या बरोबर इंदुरास ? इतक्या लवाजम्यानिशीं, त्यांना इकडं इंदूरच्या राजानं पाठवलं आहे, म्हणून म्हणते हो.

**महा॰**—अग, हे राजे म्हणजे लहरी असतात. प्रसन्न व्हायला उशिर नाहीं. आणि खप्पा व्हायलाहि उशिर नाहीं. असं पारतंत्र्य

मला नको आहे. ( हंसत ) तूंच म्हणत होतीस ना, आतां इथून हालायचें नाहीं म्हणून.

**सुंद०**—भाऊजी आतां जाऊं देणार आहेत कुठें म्हणा. पण आपलं त्याना असं मग आशेवर तरि ठेऊं नये असं म्हटलं ! बिचारा इतके दिवस पाठिस लागला आहे तो ! सत्रा ठिकाणीं हिंडू नये म्हटलें, तर त्याचा लागलीच असा अर्थ करायाचा. बाई बाई, कमी नाहीं हो कुणी ! ( हंसते. एकाबाजुनें सखारामबापू गावडे येतो. )

**सखा०**—अहाहा, या वेळेस महाराज, हे प्रत्यक्ष शेषशायी भगवान, आणि ह्या सुंदराबाई प्रत्यक्ष लक्ष्मीच मला भासतात. चला, जवळ जायला कांहीं हरकत नाहीं. इथें मज्जाव हा शब्दच नाहीं ( जवळ जाऊन नमस्कार करून खुर्चिवर बसतो. उघड ) महाराजांपाशीं मी तीच तीच गोष्ट काढून त्रास द्यावा असा अर्थ नाहीं. पण आतां कांहीं तरी टाळाटाळीचीं कारणें सांगून, महाराजांनीं येण्यास अनुमान करूं नये. आमच्या सरकारांची महाराजांच्या चरणीं किती दृढ भक्ति आहे, यास हें पत्र साक्ष आहे. यांत त्यांनीं महाराजांस जलदी घेऊन यावें, आपल्या हातून तें होत नसेल तर मला येणें भाग पडेल. असें लिहिलें आहे. सेवकाचा आतां अंत पाहूं नये. कधीं निघायचें तें मुहुर्त पाहून ठरविण्यासच लागावें आतां. उद्यां अमृतसिद्धियोग, गुरुवार आहे, मुहुर्त चांगला आहे.

**महा०**—बापू, आपल्या म्हणण्या प्रमाणें उद्यां निघण्यास हरकत नव्हती. पण आमचे हरिभाऊ सोडतील तेव्हां ना ? त्यांचीं पाहिलीत ना कशी पत्रांवर पत्रें येत होतीं येवल्यास शहाण्यांकडे होतों तेव्हां ! सगळीकडे जातां, पण भाऊकडे संगमेनरला येववत नाहीं, असें त्याचें पत्र आलें, तेव्हां तुमच्याकडे जाण्याचा बेत रहित केला, आणि इकडे आलों. आतां इतक्या लवकर हा सोडिल, असें मुळीच वाटत नाहीं. आणि शिवाय खरें पुसाल, तर राजेरजवाडयांशीं कसें वागावें, वगैरे त्यांच्या रीति भाती मला विशेष माहित नाहींत. तेव्हां—

( माधवराव येतो. )

**माध०**–( महाराजांस ) हें आप्पा वाळवेकराकडून पत्र आलें आहे, त्यांत–तो म्हणतो, महाराजांकडे असलेले माझे चार हजार रुपये,–

**सखा०**–( मध्येंच ) काय लवकर द्या म्हणून ?

**माध०**–नव्हे. 'मी नवसांत पावलों' त्याला या सालीं एकदम वीस हजार निव्वळ नफा झाल्या वरून, महाराजांकडून, कर्ज असलेले घेणार नाहीं. असा त्यानें नवस केला होता. ( एका बाजुनें 'चला हो कोन्हेर' असें म्हणत, त्यास ओढित, गणेश आप्पाजी जोशी मामलेदार, कृष्णाजी सदाशिव मुसळे फडणीस, तुकाराम राजाराम फौजदार, जीनसीवाले येतात. )

**गणेश०**–चला हो कोन्हेर ? नुसतें दर्शन घ्यायला हरकत कोणची ?

**कृष्णा०**–नुसतें बरोबर आमच्या यायला हरकत आहे का कोन्हेर ?

**कोन्हे०**–नुसतें यायला नाहीं हरकत हो. पण तुम्ही पाया पडलेत, म्हणजे आम्ही नुसतेंच उभें राहणें शोभत नाहीं, म्हणून आम्ही बाहेर उभे राहतो. तुम्ही या दर्शन घेऊन.

**तुका०**–राव चला आंत. तुम्ही पाया पडलेंच पाहिजे महाराजांच्या, असा कांहीं जोरा नाहीं कोणाचा तुमच्यावर.

**जिन०**–आणि जोरा कदाचित् कोणी करायाला लागलाच, तर फौजदार आहेतच जवळ आमचे. ( हंसतात. )

**कोन्हे०**–या कामांत उगीच आग्रह करण्यांत मला वाटतें अर्थ नाहीं. मतस्वातंत्र्य हें प्रत्येकाला पाहिजे, कोणी आस्तिक असतो. कोणी देव बीव कुछ नाहीं, असेंहि म्हणणारा असतो.

**गणेश०**–नास्तिक आस्तिकाचा इथें काय संबंध आहे ? हे बघा कोन्हेर, आस्तिक, नास्तिक, सुधारक, बडे बडे साहेब सुद्धां, महाराजांच्या चरणीं नम्र होतात. इथें भेदाभेद कांहीं नाहीं.

**कोन्हे०**–जोशी, म्हणूनच मी या सर्व लोकांना गतानुगतिक समजतो. मेंढरां सारखे हे सर्व खाड्यांत पडायचे.

**जिन**०—अहो, आम्ही खड्यांत पडतों. तुम्ही आम्हांला काढायला उभे रहा. पण चला. तुम्ही आपल्या निस्पृह वर्तनानें, आपण गतानुगतिक नाहीं, असें जगाला दाखवायला मग मागें कां घेतां ?

**कोन्हे**०—मागें घेतो असें नव्हे हो श्रीमंत—पण चला बुवा. तुमच्या म्हणण्या प्रमाणें होऊंद्या ( येतात. )

( कोन्हेर खेरिज सर्व महाराजांच्या पाया पडतात, महाराज आशिरवाद देतात. पडदा पडतो. )

पहिला प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश २ रा.

( स्थळ—कोन्हेर यांचें घर. पलंगावर कोन्हेर पोट दुखत असलेला पडला आहे बाजूला जवळ माणसें आहेत असा पडदा उघडतो. )

( निशाचर येतो. )

**निशा**०—वारे वा. आज किती दिवसांनीं तरि मला हें काम मिळत आहे. आज मोठी मौज आहे माझी. कोणाला त्रास देऊन बेजार करायचें असेल, तर तें काम मला सांगावें. फार हौस बुवा आपल्याला असल्या कामाची. ही हौस जाणूनच आज मला हें काम श्रीविष्णूनें सांगितलें. आमच्या भगवंताना ही खबर नारदानें दिली! आपल्या भक्ताचा उपमर्द झालेला पाहून, भगवंताना अत्यंत कोप आला. त्या कोपांत आतां सृष्टि जळून खाक होते कीं काय असें भासावयास लागलें. मग नारदानें भगवंतांना शांत केल्यावर, माझी या कामावर योजना झाली. ( कोन्हेरकडे पहात ) अरे अभक्ता, यशवंतराय महाराज, हे प्रत्यक्ष महाविष्णूचे अवतार असून, त्यांचा उपमर्द ? आतां ही काठी पुन्हां त्याच्या पोटास लावतों. म्हणजे पुन्हां ओरडेल. आम्ही निशाचर म्हणजे अदृश्यच. ( काठी पोटावर फिरवतो. )

**कोन्हे**०—( कळ लागल्या सारखें करून ) ओय, ओय, ओय, मेलो. मेलो. मेलो.

**निशा**०—( खदखदां हंसत ) आतां कशी झाली ? भक्ताचा उपमर्द ?

**कोन्हेरची आई**०–(त्याचे पोट चोळित) काय एकदम याला झालं बाई, देव जाणे ! कचेरींतून आला. जेवला खाल्ला चांगला. निजला येऊन मात्र. नी एकदम कळ पोटांत. काय करावं बाई ! देवाचं कांहीं चुकलं बिकलं तर नाहीं ? देवा गुण पडूंदे याला लवकर. तुझ्या नांवानं एकवीस दंपत्यं सांगेन.

**कोन्हे॰पत्नि**–( वीटेनें त्याचें पोट शेकित दुःखानें ) काय बाई एकदम झालं हें ?

**कोन्हे**०–अग, नको ती वीट. (तिच्या हातांतील वीट फेकतो.)

**निशा**०–( हंसत ) पुन्हां करतों मौज. ( काठी पोटावर फिरवतो. )

**कोन्हे**०–ओय. ओय. ओय. रामा, रामा रामा, तूं खरा आहेस रे. ( गडबडा लोळतो. )

**निशा**०–( खदखदां हसतो. ) अग गई. अबे, लंडी. आतां कैसी रडते. ( वेडावून ) रामा, रामा, रामा, आतां रामाची आठवण झाली. राम खोटा होता. उरावर बसला तेव्हां खरा झाला. रामा, रामा म्हण. का मारुति मारुति म्हण. माझ्या तडाख्यांत पुरा सांपडला आहेस. (डॉक्टर व चिमणराव या नांवाचे गृहस्थ येतात.)

**चिम**०–( बायकांस ) तुम्हीं जरा दूर व्हा. डॉक्टरसाहेब प्रकृति पाहात आहेत रावसाहेबांची. ( बायका दूर होतात. )

**डॉक्ट**०–प्रकृतीत तर कांहीं विशेष फरक पडल्याचें दिसून येत नाहीं. ( बाटली देऊन ) आतां मी एक भाग पाजतोंच. नंतर तासा तासांनीं द्यायचा एकेक. समजलं चिमणराव ? ( पाजतो. )

**निशा**०–( काठी कोन्हेरच्या पोटावर फिरवतो. ) पाजा औषधें. ( नाचतो व हंसतो. )

**कोन्हे**०–( आयाई करून ओरडून लोळतो. ) पांयां पडतो. डॉक्टर साहेब तुमच्या. औषध नका तें पाजूं मला. मला औषधांनीं गुण यायचा नाहीं.

**डॉक्ट**०–रावसाहेब, स्वस्थ पडून रहा जरा. म्हणजे गुण पडेल. ( खुर्चीवर बसतो. )

**कोन्हे**०–( पोटावरून हात फिरवित ) आतां कांहीं बरें वाटतें

डॉक्टर साहेब. अहो औषधें उगिच कां केलीं आहेत ? पण कितीही विचारी मनुष्य असो, त्याच्यावर संकट आलें कीं तो प्रथम देवभोळा बनायचाच कांहो ? मला वाटतें, संकट समय हाच ईश्वराची कल्पना मनुष्याचें अंतःकरणांत प्रथम अस्तित्वांत आणण्यास कारण झाला.

डॉक्ट०–असें तर कांहीं अंशीं खरें. पण ईश्वराचें अस्तित्व आपण नाहीं असें म्हणतां किं काय ?

कोन्हे०–यांत काय संशय ?

निशा०–( वेडावून ) यांत काय छंशय ? ( काठी फिरवतो. ) नाहींच संशय. ( कोन्हेर ओरडतो लोळतो, निशाचर हंसतो. )

कोन्हे०प०–आतां तसेंच केलें पाहिजे. त्या शिवाय दुसरी तोड मला तर कांहीं सुचत नाहीं. ( जाते )

कोन्हे०–अग आई ग. ही कळ आपल्याच्यानें आतां नाहीं सोसवत. ( स्वगत ) बाहेरून मी देवाला खोटें म्हटलें, पण देवाचें अस्तित्व खरेंच आहे. देवा तूंच माझें रक्षण कर. औषधानें कांहीं व्हायचें नाहीं.

डॉक्ट०–अहो, पडतां पडतां पडेल औषधाचा गुण.

निशा०–हा बघितलास औषधाचा गुण कसा पडतो तो ! (काठी फिरवतो. कोन्हेर लोळतो. ओरडतो. निशाचर हंसतो. ) लोक हो, सावध व्हा. असे अभक्त होऊं नका बरें ! छळ सोसावा लागतो मग ( काठी फिरवतो. )

कोन्हे०–अया या या. मेलो. मेलो, मेलो. सोडवरे रामा ! बायकोची शप्पथ तुला खोटें म्हणणार नाहीं. रोज संध्या करीन ( डॉक्टर हंसतो. )

निशा०–( वेडावून ) रोज संध्या करिन ? हें अत्तांचें म्हणणें आहे. ( काठी फिरवून ) घटकेंत विसरशील.

कोन्हे०–( ओरडतो. ) अरे राम, विष्णू, शंकर, गणपति. कोण असाल ते या. शपथ सांगतो तुम्हांला, घरच्या देवांची रोज पूजा करीन.

**कोन्हेरची आई**–काय रे देवा, माझ्या बाळाची अझून तुला दया येत नाहीं ?

निशा०–पूजा करीन! एक वचन खरें करिल तर (काठी फिरवित ) हराम यांतलें.

कोन्हे०–( ओरडतो. ) वैश्वदेव केल्या शिवाय एक दिवस रहायचा नाहीं ( डॉक्टर हंसतो. )

निशा०–( त्याच्या शब्दानीं. वेडावून काठी फिरवतो. )

कोन्हे०–( ओरडून ) अभक्ष्य भक्षण करणार नाहीं ( डॉक्टर हंसतो. )

डॉक्टर०–बरें आहे घेतों रजा मी आतां चिमणराव ! ( डॉक्टर जातो. )

निशा०–कर. कर. कर. अभक्ष्य भक्षण कर. म्हणजे माझी मजा. अरे अभक्ता, आणि पृथ्वीवरील सर्व अभक्तांनो, आपलीं मनें शुद्ध करा. आणि तीं साधुवर्यांच्या उपदेशा प्रमाणें ईश्वराकडे लावा. पहा मी निशाचर असून, तुम्हांला सुबोध करतों. इतर दुष्ट निशाचरां सारखा मी नाहीं. मी अपल्या निशाचरी वृत्तीनें, जर इथें एकच भूकंपाचा धक्का देईन, तर या पृथ्वीच्या पोटांत तुम्हा सर्वांस गडप व्हावें लागेल. म्हणून त्या सर्व सत्ताधारी प्रभूला विसरूं नका. बजाऊन सांगतों, साधूंची निंदा करूं नका. कराल तर असा त्रास सोसावा लागेल. ( काठी फिरवतो. )

कोन्हे०–( ओरडून ) यशवंतराव महाराजा, तुमची व्यर्थ निंदा केली. हा पापी चांडाळ आहे, याला क्षमा करा. पुन्हां मी आपली निंदा करणार नाहीं. प्रत्यक्ष महाविष्णू आहां आपण.

निशा०–( हंसत नाचत ) लोक हो, मला दूषणें देऊं नका बरें. हा सारा या काठीचा गुण आहे. हीच लबाड त्रास देते. साधुची निंदा केली, की ही जादूची कांडी बसलीच बोकांडीं.

कोन्हे०प०–( प्रवेश करून तीर्थ पुढें करून ) इकडं बघायचं. हें तिर्थ आणलं आहे देवांचं महाराजां कडून. हें घ्यावें !

कोन्हे०–( पाहून ) दे दे दे लवकर. आहाहा, महाराज यशवंतराव, आपण खरे साधु आहांत.

कोन्हे०प०–( पाजित ) जय यशवंतराव महाराजा, गुण पडूंदे लवकर. नवस केलाच आहे तुम्हांला.

निशा०—काय? महाराजयशवंतरायांचें तिर्थ हा प्याला? शाबास! चला तर. आपल्याला इथून आतां पळ काढला पाहिजे. (जातो. )

कोन्हे०—प्रिये चल, महाराजांचें दर्शन घेण्यास, हा असाच निघणार. हें तिर्थ घेतल्या बरोबर, पोट अगदीं साफ झालें. मला आतां अगदीं पहिल्या सारखें वाटतें. ( तिचा हात धरून उठतो, जातात. )

दुसरा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळ—मनमाड तुकोजीरावांच्या तंबूतिल बसायची जागा. तुकोजीराव होळकर एकटेच बसले आहेत. )

तुकोजी—( आपल्याशीं ) या स्वप्नाचा दुसरा काय अर्थ होणार? पहाटेस पडणारीं स्वप्नें, बहुधा खरीं होतात. काय चमत्कार ! असें स्वप्न मी आज पर्यंत कधींच पाहिलें नव्हतें. स्वप्नांत प्रथम शिकारिला निघालों काय, तितक्यांत एक घोडयावर बसलेला तरूण तेजःपुंज सरदार काय आला ! खचित ती खंडेरायाचीच स्वारी. ती सर्वांगावर भंडार उधळलेली मूर्ती दुसऱ्या कोणाची असणार ? अहा, आज मला किती आनंद आणि धन्यता वाटत आहे ? बरें पुढें जी स्वप्नांत गम्मत पाहिली, ती तर फारच मौजेची. मला वाटलें, मी एका वृक्षाखालीं उभा आहे आणि मी त्याचें फळ घोड्यावरूनच हातानें तोडित आहे. हें माझें कृत्य पाहून, तो घोडयावर बसलेला सरदार मला हंसत म्हणतो, कशाला व्यर्थ मेहनत करतोस ? तुला जर तें फळ पाहिजेच असेल, तर घोड्यावरून तुला उतरलेंच पाहिजे. झाडावर चढून काढल्या शिवाय तें तुला मिळणें अशक्य आहे. मी सलाम करून म्हणालों,सरदारसाहेब, आपला हात पोंचण्यासारखा आहे, तरि कृपा करून तेवढें फळ मला काढून द्या. नंतर तो पुन्हां हंसला. आणि झाडाजवळ गेलेसें करून, मला त्यानें आपलाहि हात पोंचत नाहीं, असें दाखवलें. व लागलीच मला त्यांनीं जबरीनें घोड्यावरून उतरण्यास भाग पाडलें. मी झाडा-

वर चढून पहातों तों तें फळ दिसेनासें झालें. तेव्हां निराश झालों. पण इतक्यांत पहातों तों, तेथेंच झाडाच्या फांदीवर एक शांत, तेजस्वी पुरुष बसला आहे. त्यास मी नमस्कार करून नांव विचारलें, परंतु तो शांत पुरुष कांहींच बोलला नाहीं. मात्र आमच्या या सरदारसाहेबानें त्याचें नांव यशवंतराय महाराज असें सांगून, त्याज पासून फळ मागून घेण्याची मला इषारत केली. त्या प्रमाणें, मी फळ मागतांच त्या शांत पुरुषानें तें मला दिलें. ह्या स्वप्नाचा जों जों विचार करावा, तों तों आनंद अधिकच होतो. ( भागिरथीबाई येते. )

**भागिरथी**—आज मुद्रा फार प्रसन्न दिसते आहे ! कांहीं आनंदाचे बेत चालले आहेत मनांतल्या मनांत वाटतं. मला नाहीं का कळवायचं इतके कसले आनंदाचे विचार चालले आहेत ते ?

**तुकोजी**—( हनवटीस हात लावून ) माझ्या लाडकीला नाहीं सांगायचें, मग कोणाला सांगायचें ?

**भागि०**—लाडकी असं आतां आपलं नसतं बोलायचं. धाकटी लाडकी असते कां मोठी बरं ? माझं अजून लाडकेपण संपलं नाहीं का ? आपणच सांगावं ?

**तुको०**—मीच सांगतो. अग, माझ्या दोन्ही लाडक्याच. तू मोठी असलीस तरी मला लाडकीच. आणि ती धाकटी म्हणून कांहीं प्रेम तिच्यावर जास्त नाहीं. पण आजच हा सवती मत्सर कुठून बुवा तुझ्या डोक्यांत शिरला ? अगदीं धाकव्या बहिणी प्रमाणें, तिला मानित आहेस, आणि माझ्या पेक्षां सुद्धां तुझें प्रेम तिच्यावर जास्त आहे ह्मणून विचारतो.

**भागि०**—अगे बाई, नुसतं विचारलं कीं, धाकटी लाडकी कां मोठी, तर लागलीच त्याचा सवतीमत्सर करायचा ना ? शर्थ आहे बाई. एक आपली जगाची रित सांगितली तर—

**तुको०**—बरें तें जाऊं दे. आज आनंद कां झाला आहे तो सांगूना?

**भागि०**—( हंसत ) आपल्या गळ्यांत आलं, कीं मग तें जाऊंदे ना ? (गळ्यांत हात घालून ) बरें, कसले आनंदाचे बेत चालले होते?

**तुको०**—अग, पहाटेस आज स्वप्न पाहिलं, त्यांत प्रत्यक्ष खंडे-

रायांनें असें सुचविलें आहे कीं, माझ्या दर्शनास जेजुरीस येण्याचे अगोदर यशवंतराय महाराजांचें दर्शन घे.

भागि०–अग बाई, तर माझ्या स्वप्नाला आणि आपल्या स्वप्नाला मेळ बसला. मी पण आजच पहाटेस स्वप्नांत पाहिलें, कोणी एक साधुपुरुष आहे. आन् त्याला मी आपली यशवंतराय महाराजच समजतें आहे, आणि बाई त्यांची आपण, देवाची जशी पूजा करतो, तशिच करित आहो.

( धाकटी राणी येते. )

तुको०–( हंसत ) ही आली, हिलाहि एकादें असें स्वप्न पडलं असेल–विचारतो तिला. ( जवळ येते तिला आपल्या दुसऱ्या बाजूस बसवतो . )

धाकटी राणी–काय विचारायचं ह्मटलं मला ?

भागि०–( हंसत ) स्वप्न पडलं कां ह्मणून हो ? कमी कां आहे चेष्टेखोर स्वभाव मी ह्मटलंना मला स्वप्न पडलें ह्मणून.

धाक०–स्वप्नें पडतातच. ( तुकोजीस ) त्यांत चेष्टा कसली करायची ?

तुको०–अग, मला स्वप्न पडलें, असें हिला मी अगोदर सांगितलें, तर ही ह्मणते मला पण पडलें. मग चेष्टा कोणी केली ?

धाक०–बाई कांहीं चेष्टा करायच्या नाहींत. ( हंसत ) आपलाच स्वभाव चेष्टेखोर आहे. त्यांना खरखुरच स्वप्न पडलं असेल. त्या खोट्टं कद्धींच सांगायच्या नाहींत.

तुको०–आतां तुह्मी दोघी झाल्यात एक. आम्ही आतां आपले गप बसतो. ( धाकटीस ) अग पण, हिला असं विचार, कीं मला तिला स्वप्न एकच कसें पडलें ?

धाक०–( हंसत ) मग असं पडत नाहीं किं काय ? पण खरंच असं काय स्वप्न पडलं ? ( भागिरथी जवळ जाऊन बसते ) बाई, तुम्हीच गडे सांगा मला. इकडं चेष्टा कांहीं संपायच्या नाहींत.

तुकोजी–( स्वगत ) धन्य आहे मी ! ह्या दोन्ही स्त्रियांना मी सारख्या वागवतो. आणि त्याहि सख्या बहिणी प्रमाणें एकमेकींवर प्रेम करतात. ( धाकट्या राणीस पुन्हां पहिल्या जागेवर बसवून

हंसत उघड ) हं समजलें, समजलें प्रेम एकमेकिवरचें. सगळें वरवर आहे, तें मला माहिती आहे.

**भागिरथी व धा० रा०**—आपल्यावरून जग ओळखायचं म्हणजे झालं.

**तुकोजी**—बरें तें असूं दे. आतां कल्याणवरून जेजुरीला जाण्याचा बेत होता तो रहित केला आहे. येथें जवळच येवल्यास, यशवंतराव महाराज आहेत, त्यांचें दर्शन घेऊन पुढें पायवाटेनें जेजुरीला जायचें. कसें काय, बेत पसंत आहेना ?

**भागिरथी व धा० रा०**—पसंतच असायचा. साधुचें दर्शन पाप्या शिवाय कोण नको म्हणेल ?

**भागिरथी**—हे कोण सखाराम बापु गावडे आले वाटतें ?

**धाकटी**—कोण बापु का आला आहे ? केव्हां आतांच आला वाटतं, महाराजाकडून ? ( सखाराम बापु गावडे येतो, व 'रामराम करून बसतो. )

**तुकोजी**—कां बापू नाहींना वळत गाडें तुम्हाला ? आतां आम्ही स्वतांच महाराजांकडे येण्याचा बेत केला आहे. असें येवल्यावरूनच जाऊं पायवाटेनें, जेजुरीस म्हणजे झालें. आज पहाटेस दृष्टांतहि असाच झाला खंडेरायांचा.

**सखाराम**—मोठें नाजूक काम बुवा. मन तर अशा साधुपुरुषाचें दुखवतां येत नाहीं. राजीखुषीनें होईल तेवढें पहायचें. हौशिनें काम हातीं घेतलें खरें, पण तें अखेर अंगास आले, माझा तेथें काय इलाज आहे बरें ! सरकारानीच सांगावें ! मी आपल्याकडून कांहीं कसूर केली नाहीं. पण टाळा टाळी फारच साधते बुवा ( हंसत ) आतां आपल्याला तरी स्वारी वळते किं काय याची शंकाच आहे मला.

**तुकोजी**—कां बरें ? माझातर तर्क आहे किं, सहज वळावी म्हणून.

**सखाराम**—सरकार, मी आपणापासून महाराजांना आणायला निघालों, तेव्हां माझा नव्हता का असाच तर्क ? पण तो कोठपर्यंत होता ? जो पर्यंत ती गंभीर आणि शांत मुद्रा प्रत्यक्ष पाहिली नव्हती तो पर्यंत ! थोरपणा चेहऱ्यावर इतका स्पष्ट स्वारीच्या आहे किं

कितीही मोठया दर्ज्यांचा मनुष्य असो, मोठा गवर्नर असेना त्याला सुद्धां टोपी काढायची बुद्धि व्हायचीच. आपण कोणी यःकश्चित आहो, असें त्याला वाटावयाचें.

**भागिरथी**–( एकिकडे धा० रा० स ) अशा साधूपुरुषांचें केव्हां दर्शन घेऊं असं मला झालं आहे बाई.

**धाकटी**–मला सुद्धां तसंच झालं आहे.

**सखाराम**–पुण्या मध्यें स्वारी एकोणीस दिवस होती. जिकडे तिकडे मेजवान्या. आणि पानसुपाऱ्या. पुणें नुसतें खुललें होतें. लोकांना असें वाटलें कीं, सवाई माधवरावच हौस पुरी झाली नाहीं त्या वेळेस, ह्मणून पुन्हां अवतार धरून आले.

**तुकोजी**–अहाहा. या सत्पुरुषाच्या चरणीं मस्तक ठेऊन केव्हां बरें मी कृतार्थ होईन !

**सखाराम**–राजविलासाचीं चिन्हें आहेत त्या महापुरुषाची, पलंग, हार, तुरे, गजरे, अत्तरें, उदबत्त्यांचा सुगंध, यांचे फार शोकी. तसेच गाणें. पण खाणें मात्र तामसी. तिखटाचा गोळा आणि मुइमुगाचे दाणे असले, ह्मणजे दुसरें, त्याच्याहून प्रिय कांहींच नाहीं. बरें बोलण्या चालण्याची वृत्ति सत्वगुणी.

**तुको०**–मग श्रीदत्तात्रयांचे अवतार, असें म्हटलें पाहिजे.

**सखा०**–पण दत्ताची भीक्षावृत्ति मुळींच नाहीं त्यांचें ठिकाणीं.

**तुको०**–पण काय हो ? अशा अडचणी ते वारंवार तुह्मांला सांगत तरि काय ?

**तुको०**–अडचणी कांहीं खोट्या नवत्या. वरचेवर लोकांचीं बोलावणीं येत, कोणी नवें देऊळ बांधलें, त्या महाराजाना. करवा त्यांच्या हातून देवाची प्राण प्रतिष्ठा. ताईबाई शिंत्रे ह्मणून कोणी आहे मेढे गांवाची–

**तुको०**–हें मेढें कोठलें ?

**सखाराम**–तें कोठें तिकडे, आलिबागेकडे आहे. तिनें अशीच महाराजांच्या हस्तांनीं, सितारामाची प्राण प्रतिष्ठा करवली. नंतर विष्णूदास पंडित, ह्मणून कोणि एक नेमिष्ट ब्राह्मण आहेत, त्यांनीं ' विष्णू याग ' नांवाचा यज्ञ केला, तेव्हां त्यांनींहि महारा-

जांना तिकडे नेलें होते. महाराजांची भक्ति लोकांना अतोनात आहे. महाराज आले इतकी वार्ता कळली पुरे, सगळा गांवच्या गांव लोटतो दर्शनाला. येवल्यास या एकदां मोठी गम्मत उडाली. महाराजांचे धाकटे बंधु रामचंद्रदादा, हे कांहीं कामा करतां म्हणून तेथें गेले होते. त्यांच्या व महाराजांच्या चेहऱ्यांत साम्य आहे-

तुको०-मग?

सखा०-मग काय? लोकांत झाला पुकार किं महाराज आले म्हणून, सगळा गांव लोटला. रामचंद्रदादा सांगत 'मी महाराज नव्हे' असे होतां होतां, बऱ्याच वेळानें जेव्हां लोकांस हे आलेले महाराज नव्हेत, असें कळलें, तेव्हां प्रत्येक जण खजिल झाला.

भागि०-( धा० रा० स ) काय ग, बाई तरि गम्मत? ( दोघी हंसतात )

तुको०-एकंदरींत अशी मजा झाली होती या येवल्यांत म्हणतां? बरें आणखी काय झाले चमत्कार?

सखा०-चमत्कार कसले म्हणा-पण पुढें मग दुष्काळ आला, त्या मुळें त्याच कामांत महाराज गुंतले. मग त्यांच्यापाशी इंदुरास निघण्याची गोष्ट काढण्यास तोंडच नव्हतें आम्हांला. अशी भूतदया, खरोखरीच त्रिभुवनांत नसेल. दुष्काळग्रस्तलोकास महाराजांनी स्वतः अन्न द्यावें. बरे दुष्काळी तरि थोडे थोडकेकां? सगळ्या दुष्काळ्यांना अन्न दिल्यावर, मग आपण जेवायचें, हा महाराजांचा नेम. कधीं कधीं तर महाराज रात्रींचे बारावाजतां अन्नास मिळत. असा दयाशील, दुसरा कोणी मायेचा पुत या जगांत असेल असें मला तर वाटत नाहीं.

तुको०-बापु, तुम्हांला अशा सत्पुरुषाचा, आज पांच वर्षं सहवास तरि घडला. मी तुम्हांला पुण्यवान प्राणी समजतो.

सखा०-दयेचा तो केवळ मूर्तीमंत पुतळा आहे, उन्हाळ्यांत एक दिवस रस्त्यानें जात होते, इतक्यांत एक फाकिर आला, आणि म्हणाला, 'महाराज विना जूते पाव जल रहे है' महाराजांनीं स्वतःच्या पायांतला नवा जोडा, ताबडतोब त्याला काढून दिला. आणि आपण तसेच पाय भाजत चालले.

**तुको**०–एकेक गोष्ट ऐकावी तर, प्रेम महाराजाविषयीं ती जास्तच वाढवित आहे.

**सखा**०–बरें दया म्हणजे ती अमक्यावरच करायची, आणि अमक्यावर नाहीं असा भेदाभेद मुळीच नाहीं. एकदां एक गाढव रस्त्यांत मरत पडलें होते, तें स्वारिनें पाहिलें. मग काय गेले जवळ गाढवाच्या, त्याला झोपडी बांधवून, त्याच्या चाऱ्या पाण्याची व्यवस्था केली. शेवटीं तें मरताना, थोडीशी भागिरथी त्याच्या तोंडांत आणून घातली. आणि त्या गर्दभानें नंतर प्राण सोडले. गाडी हाकलणाराला तरि तसेंच. बैलाला कधीं मारूं द्यायचे नाहींत. गाडी सावकाश चालली तरी फिकीर नाहीं.

**तुको**०–बरें तर. मग आतां वेळ घालवण्यांत अर्थ नाहीं. आपली गाडि येथून लवकरच हाकलली पाहिजे. चला. आतांच्या आत्तां कुच करायचा हुकूम द्या. म्हणजे संध्याकाळीं येवले. आपले तंबू वगैरे तात्पुरती व्यवस्था, लवकर पुढं जाईल अशी व्यवस्था करा. मीहि त्याच तजविजीला लागतो.

**सखा**०–( आज्ञा. म्हणून जातो. पडदा पडतो. )

तिसरा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ४ था.

( स्थळ. येवलें, शाहाणे यांचें घर, सुंदराबाई एकट्याच येतात. )

**सुंद**०–( स्वगत ) तो इंदूरचा राजा आपल्या गांवीं परत गेला, त्याला पोंचवायला म्हणून, बरोबर जायचं, तर हेंगं कायबाई, त्या राजानं आपलं, त्याच गाडींत बसवून आपल्या बरोबर ह्यांनांहि घेऊन गेला. अगोदर कांहीं बेत ना हीं कांहीं नाहीं. तरि मला वाटलंच असं होईल म्हणून ! जाताना इतकं म्हणणं झालं होतं किं, राजाचा आग्रह फार आहे आपल्या तिकडं चला म्हणून! पण माझा जाण्याचा विचार नाहीं. मी त्यांना स्टेशनावर पोंचवून येतो. तर बाई त्यांना पण बरोबर घेऊन गेला तो राजा. आणि तुम्ही उद्यां निघण्याची तयारी करा, म्हणून काळू आला सांगत. बरें जायचं तर जायचं, बरोबर तयारी हवी का नको तशी बाहेर गांवीं जाय-

चें म्हणजे. ती पण नाहीं. बाकी' राजा बोलेनी दळ हालें' राजा आहे तो, तेव्हां अडायचं नाहीं कांहीं म्हणा. पण देव बरोबर नेले नाहींत. आणि त्यांची पुजा केल्याशिवाय अन्न घ्यायचं नाहीं हा नेम आहे. म्हणून वाटतं. देव तिकडं जात तों पर्यंत उपास पडणार! बाकी देव घेऊन मागच्या गाडीनं ब्राह्मण गेलाच आहे. तेव्हां तितकी काळजी नको. शिवाय त्या राजाची इकडच्यावर भक्ति तर फारच आहे. इकडची आज्ञा म्हणजे अगदीं शिरसावंद्य पहिल्या भेटीलाच त्यानं केवढे उची उंची पोषाख इकडं नजर केले. मलाहि लुगडं चोळी म्हणून, चांगला दहा हजारांचा विषय दिला. पण इकडं शिवायचं सुद्धां नाहीं त्याला. तें सगळें परत करून, शिवाय त्या राज्याच्या दोन मुलांना आणि दोन्ही राण्यांना भरगची पोशाख द्यायचे झाले इकडून. आपलं दैन्य म्हणून कधीं कोणाला दाखवायचं नाहीं. हा मोठा स्वभाव. पण मी म्हणतें दुसऱ्या पुढं नको, पण मेलं राजापुढें दाखवायला काय हरकत आहे? पण स्वभाव, त्याला कांहीं औषध आहे? ( स्वतःस दोष लावित ) पण स्वभाव तसा असला, म्हणून मेलं वाईट काय झालं त्यांत? देव कांहीं कमी पाडित आहे कां? उलट अशा स्वभावानं अधिक अधिकच देतो. ( आंतून सुंदरा बाई अशी हाक येते. ) कोण? आले हो गिरजाबाई, चला जाऊं द्या बाई. उद्यांच्या जाण्याच्या तयारिला लागलं पाहिजे. ( जाताना ) बाहेर गांवाला जाणं म्हणजे माझं मन असं उदास कां बरं होतं?

चवथा प्रवेश समाप्त.

---

## प्रवेश ५ वा

( स्थळ—मनमाड. पात्रें—मदनश्रीकृष्ण, आणि माधवराव. )

**माध०**—ही बातमी तुम्हांला समजलीच नाहीं वाटतें? महाराज आतांच येथें आलें. म्हणजे हें कसें तें फोडून सांगतो. कलकत्यास प्रदर्शना निमीत्त निजाम सरकारची स्वारी व्हाईसरायच्या मुलाखतीस गेली होती, त्याज बरोबर त्यांचे दिवाण नरेंद्र बहादूर

होते. त्यांच्या मनांत महाराजांचें दर्शनाची अत्युत्कट इच्छा होती-म्हणून त्यांनीं महाराजास एक कलकत्याहून पत्र लिहीलें, किं मला आपण खांडवेमुक्कामीं येऊन दर्शन देण्याची मेहेरबानी करावी.

**मदन श्रीकृष्ण**०–पण इंदूरच्या महाराजांनीं त्यांना कसें सोडलें ? याचें मला मोठें नवल वाटतें.

**माधव**०–नवल कसलें त्यांत. त्यांना भेटून लवकर परत येतो असें सांगून महाराज निघाले तेथून. तरि थोरल्या राणीसाहिब, मा साहेब म्हणतात त्यांना, त्या नवत्याच सोडित महाराजाना. बिचारीची महाराजांवर भक्ति अतोनात.

**मदन**०–( धांदलिनें ) मग ते परत जायचे असतील इंदुरास ? तुम्ही त्यांच्याच बरोबर आला आहा वाटतें ?

**माधव**०–होय. मी त्यांचा कारकून आहे. माझें नांव माधवराव. आपल्याला मीं पाहिलेले आहे, पुण्याला असतांनां. त्यांचा विचार परत यायचा दिसत नाहीं.

**मदन**०–हं ? तर आतां तुमच्या जवळ, बोलायला हरकत नाहीं. मी महाराजानांच घेऊन जायला आलो होतो. अर्थात् महाराज इथें आहेत ही बातमी मला नव्हती. म्हणून मी इंदुरास जाणार होतो. काय सत्पुरुषांची अगाध लीला आहे पहा. इथें महाराज आले आहेत, हें ऐकून मला किती आनंद झाला आहे,तो शब्दांनीं व्यक्त करतां येण्या सारखा नाहीं. अहो, आमचें कुटुंब आहे, अस्वावस्थ. तिची फार इच्छा आहे, कीं एकदां अशा वेळीं महाराजाचें दर्शन घ्यावें. महाराज गेले आहेत कोठें ?

**माधव**०–काळुला घेऊन ते तुम्हीं येण्याच्या किंचीत आधीं विठ्ठलमंदिरांत गेले आहेत. हा मीहि तिकडेच निघालों आहे.

**मदन**–चला तर मीहि तुमच्या बरोबरच येतो. किंवा तुह्मी इथेंच असा. मी त्यांना इकडे घेऊन येतो. नाहीं तर चला, दोघेहि जाऊं, आणि घेऊन येऊं त्यांना. ह्मणजे लागलीच या आत्तांच्या गाडीनें पुण्यास जाण्याला ठीक पडेल. ( जातात )

( प्रवेश पांचवा समाप्त. )

---

## प्रवेश ६ वा.

( स्थळ-पुणें, मदन श्रीकृष्णाचें घर, मदन श्रीकृष्णाची पत्नी मुक्ताबाई दुखण्यानें पडली आहे असे दिसतें. )

मुक्ताबाई–( कण्हत ) आतां कांहीं मी या दुखण्यांतून वाचत नाहीं. सारखीं औषधें चाललीं आहेत. मेले थोडे का उपाय केले ? पण ज्याचं नांव तें, गुण म्हणून नाहींच. दिवसेंदिवस जास्तीच दुखणं आपलं. देवा सोडव आतां या हालांतून लवकर. कंटाळा आला या जगाचा. कसला हेतू राहिला नाहीं. महाराजांचें दर्शन घेतां घेतां हे प्राण सोडावे एवढा काय तो हेतू राहिला आहे. तेवढा पूर्ण कर म्हणजे गंगेस घोडे नाहले माझे ! राम, राम, राम. या राम पहाऱ्यांत देवा, तुझें नांव येऊं दे. ( थांबून ) सकाळ झाली, कि आपली ही पक्ष्यांची किलबिल सुरू झाली. ही ऐकून मला किती आनंद वाटावा ? पण मेली तीच आतां कटकट वाटते. सहन होत नाहीं. बिघडला मेंदू. देवा, तूं उत्पन्न केलेल्या, या आनंदि प्राण्यांची जिला कटकट होते, अशा या दुष्टेला जिवंत तरी कशाला ठेवलीस ? या वेळेला वारा कसा गार सुटतो, जरा जाऊन बसेन म्हटलं वाऱ्यांत तर–लागलीच घरांतलीं माणसं कोल्हे कुई करतील. पण त्यांना तरि काय दोष लावतें मी ? ते कां माझ्या अहिताचं सांगतात ? काय बाई, कोणाकड दोष नाहीं. माझ्या कर्माचा हा सगळा दोष आहे. हेच जर माझें कर्म धड असतें तर गुण नसता आला ? माझ्या दुखण्यापासून तिकडे विश्रांती कशी ती मुळींच माहित नाहीं. आतां माझी आशा सोडा, आणि इतकी जिवाची आटाट करून घेऊं नका, दुखण्यांत पडाल, म्हणून कितीदां सांगितलें. पण ऐकायचेंच नाहीं. उलट म्हणायचं, तुझ्या बरोबर अजारी पडायचं माझं भाग्य कुठं आहे ? ( रडत ) देवा, जन्मोजन्मीं मला हेच पति मिळूं देत. आतां महाराजांच्या चरणावर हा देह ठेवावा, एवढा हेतू ओहरे नारायणा. काल इकडून जाणं झालंच आहे इंदूरास महाराजांना आणण्या करतां. पण महाराज कसले येतात ! इंदूर म्हणजे किती लांब. इंदूरच्या राजानं त्यांना सोडलं

पाहिजे. किती तरि विघ्नं आहेत. कसला माझा हेतू पूर्ण होतो ? मी अशीच मरणार ! ( थांबून ) अग बाई, पण मी अशी निराश कां होते ? इकडून कोणी गेलं आहे, ते आणल्या शिवाय राहतील का महाराजांना ? आणि महाराज तरि सर्व हकिगत ऐकल्यावर आल्याशिवाय राहतील का ? भक्तांचा कनवाळू तो विष्णूचा अवतारच आहे. आतांच जरा डुलकी लागली होती. इतक्यांत महाराज आलेले पाहिले. पण ते स्वप्नांत. महाराजा, तुमचीच प्रार्थना करते, या, आणि एकदां या आपल्या दीन दासिला दर्शन द्या. ( पाहून ) या पहा, राधा आन गोपिका घोरत पडल्या आहेत. बिचाऱ्यांना माझ्या मुळं रात्रिच्या रात्री झोंपेशिवाय काढाव्या लागतात ( चाहूल ऐकलेसें करून ) कुणी आलं वाटतं ? ( मदनश्रीकृष्ण व महाराज येतात. )

मुक्ता०-( हर्षानें ) अगबाई, आपणच का ? आणि महाराज पण आले ? परवां येईन म्हणून म्हणायचं तें इतक्या लवकर-

मदन०-सर्व सांगतों तुला. स्वस्थ पडून रहा तूं. ( तिला निजवतो. महाराजांस बसण्यास खुर्ची देतो, महाराज बसतात. )

महा०-बाई, आपण स्वस्थ असावें. आपल्या इच्छेप्रमाणें मी आलों आहे बरं. प्रकृति अस्वस्थ होईल, असें कांहीं करूं नका. श्रीनरहरिचें चिंतन करित स्वस्थ पडा.

मुक्ता०-महाराज, माझ्यानं फार बोलवत नाहीं, चालवत नाहीं, शक्तिच नाहीं राहिली आतां माझ्या अंगांत ! पण एकदां तशीच उठून आपल्या चरणांवर लोटांगण घालण्याची, या तुमच्या दीन मुलीची इच्छा आहे हो. तेवढी पूर्ण करा. मला आई नाहीं बाप नाहीं. पण त्यांच्यापेक्षां सुद्धां आपण मला जास्त वाटतां. ( उठते, मदनश्रीकृष्ण तिचा हात धरून महाराजांच्या पायावर घालतात. )

महा०-( त्यांस उठवून ) बाई, श्रीनरहरिचरणीं एकनिष्ठ भाव ठेवा. सर्व कामना सफल होतील.(मुक्ताबाईस मदन पुन्हां निजवतो.)

मुक्ता०-आतां माझी कांहीं कामना राहिली नाहीं. इतकीच कामना होती. आतां मी सुखानं मरेन. पण इतकं माझं नशीब कुठें आहे प्रत्यक्ष परमेश्वराचं दर्शन घेत असतां मरण येयाचं ?

महा०—बाई, मी यःकश्चित मनुष्य. परमेश्वराची आणि माझी बरोबरी कशी होईल? बाई, प्राणीमात्राला उत्पन्न करणारा तो आहे. लय करणाराहि तोच. त्याच्या इच्छे बाहेर आपणा मनुष्याच्यानें काय होणार ? तो ठेवील त्या स्थितींत आनंद मानून राहणें, म्हणजेच त्याची आज्ञा पाळणें आणि तसें न करणे म्हणजे तें त्याची आज्ञा भंग करण्या सारखें आहे.

मदन—मरण कधीं येईल, हाच हव्यास नेहमीं धरला म्हणजे त्याच काळजीनें मनुष्य जास्त अजारी होतो. तसें करणें म्हणजे ईश्वराची आज्ञा मोडणें आहे समजलीस ? महाराजांचें तरि ऐक आतां. ( महाराजांस ) नेहमीं हिचे हे विचार चालतात त्या मुळें प्रकृति जास्त बिघडते.

मुक्ता०—महाराजांच्या मुखांतून शेवटीं थोडासा उपदेश ऐकावा अशी इच्छा आहे.

महा०—बाई, आपण सुज्ञ आहां. मी काय आपल्याला उपदेश करावा ? माझी काय उपदेश करण्याची योग्यता आहे ? मी कांहीं विद्वान नाहीं, किं धर्म गुरु नाहीं. त्यांनीं तर स्त्रियांना पतीच्या सेवे-सारखें दुसरें कांहीं नाहीं, असें सांगितलें आहे. वेलींना झाडा शिवाय जशी उच्च गति दुष्प्राप्य, तशी स्त्रियानांहि पति शिवाय उच्च गति दुष्प्राप्य आहे. तेव्हां पतीची सेवा हेंच स्त्रियांचें मुख्य व्रत. पुरषानींहि स्त्रियांना त्यांच्या सेवेचा योग्य मोबदला देणें त्यांचें कर्तव्य आहे. संसारांत आणि परमार्थांत जेव्हां जेव्हां अडचणी उद्भवतात, तेव्हां तेव्हां पुरषांचें मन रंजविण्याचें काम स्त्रियांचें आहे. आणि श्री नर-हारिचें चिंतन करित त्या अडचणी दूर करण्याचें काम पुरषांचें आहे. ( आंतून एकजण येतो व 'बाइंचे पथ्याचें आणि चहा तयार आहे ' असें सांगतो. )

मदन—पथ्याचें बाईना म्हणावें इकडेच घेऊन या. ( महाराजांस ) चहा घ्यायाला चलावें. ( जातात. )

अंक पांचवा समाप्त.

# अंक ६ वा.

## प्रवेश १ ला.

( स्थळ—नासिक रस्ता. पात्रें—त्रिपूर आणि धूम्रमुख येतात. )

त्रिपूर०—कां कोणिकडे निघालात ?

धूम्र०—दुसरें कोणीकडे, हल्लीं सर्व जनस्थानवासी लोक जिकडे जातात तिकडेच.

त्रिपूर०—म्हणजे, महाराजांच्या दर्शनाला किं काय ?

धूम्र०—होय, महाराजांची प्रकृति पुष्कळ नादुरुस्त आहे म्हणतात.

त्रिपूर०—तर तुमचें व आमचें जाण्याचें ठिकाण जुळलेंच म्हणायचें.

धूम्र०—अहो, तुमचें आमचेसें काय पण ह्या रस्यांतून जाणाऱ्या बहुतेक लोकांचें तसेंच जुळणार आहे. त्या महात्म्याच्या दर्शना करितां ह्या पहा झुंडीच्या झुंडी चालल्या आहेत,

त्रिपूर०—( पाहून ) हेंच त्यांचें घर ना हो ?

धूम्र०—होय हेंच. ते पहा. पुष्कळ ब्राह्मण याचक तृप्त होत्साते पळी पंचपात्री खणखण वाजवित ज्या दारांतून बाहेर पडत आहेत तेंच घर. बाहेरून दर्शनाला जाणाऱ्यांची आणि त्यांची एकच गर्दी झाली आहे. चला, आपणहि आंत शिरूंया. ( जातात. )

( नंतर महाराज पलंगावर निजले आहेत, जवळ वाड व जोगळेकर बसले आहित, हरीबाई बळीरामदादा व नारायणराव आहेत. ब्राह्मण विष्णुसहस्रनामाचा पाठ ह्मणत आहेत, लोक दर्शन घेत आहेत असा पडदा उघडतो. )

वाड०—( दर्शन घेणाऱ्या मंडळीस ) महाराजांची आज फारच प्रकृति बिघडली आहे. तरि दुरून दर्शन घेण्याची आज व्यवस्था ठेवली आहे. कृपा करून मंडळीनें दुरून दर्शन घ्यावें.

महा०—( हात वर करून अडखळत ) येऊं द्या बरें, सर्वांना पहिल्या सारखें आंत येऊं द्या. कोणाला मनाई करूं नका.

**जोगळेकर**–( वाडास ) महाराजांच्या इच्छे प्रमाणें चाललेलें ठीक येऊंद्या मंडळींना आंत. ( मंडळी येतात. नमस्कार करतात. )

( बिवलकर वैद्य येतात. )

**वाड**–यावें वैद्यराज. महाराजांची प्रकृति आज एकाएकी फार बिघडली म्हणून आपल्याला बोलावणें पाठविलें होतें.

**वैद्य**–( महाराजांची प्रकृति पाहातो ) विषमज्वर आहे. स्थिती कठीण आहे. पण औषध योजनाकरून पहातो मी.(मात्रा उगाळतो)

**महा०**–(अडखळत) श्रीनरहरी, श्रीनरहरि, श्रीनरहरीचें तिर्थ फक्त माझ्या मुखांत घालावें. औषध नको. औषध नको.

**जोगळेकर**–, **वाड**– } महाराजांनीं औषध घ्यावें. त्या शिवाय प्रकृति कशी सुधारेल ?

**नारायण**–महाराज-काका तोंड उघडा. हें औषध घ्या.

**महा०**–औषध घेण्याची माझी इच्छा नाहीं. श्रीनरहरितीर्थ माझें औषध आहे.

**वैद्य**–महाराज त्रिकालज्ञ आहेत. ते सर्व जाणून आहेत. आपल्या औषधानें या समयीं कांहीं व्हायचें नाहीं. त्यांचीं तंद्रि दुसऱ्या बाजूला लागली आहे. औषध घ्यायच्या वेळेस त्यांनीं घेतलें. महाराज अवतारिक पुरुष आहेत हें लक्षांत घ्या. म्हणजे—

**जोग०**–होय तें खरेंच. ( वाडास ) मला वाटतें ह्या सर्वजनप्रिय महात्म्याच्या—

**वाड**–( दुखानें ) हर, हर, अवतारसमाप्तिची वेळ आली काय?

**जोग०**–संन्यास घ्यायचा असला मनांत तर विचारून पहावें महाराजांना !

**वाड**–, **जोग०**– } ( महाराजांस ) संन्यास घेण्याची इच्छा आहे काय?

**महा०**–नाहीं. त्यानें पुनर्जन्म घडत नाहीं.

**वाड**–, **जोग०**–, **वैद्य**–, **सर्व**– } हर हर, काय हा प्रसंग ! आतां हा महात्मा आम्हां सर्वांना सोडून जाणार काय ?( दुःखित होतात. )

( धूम्रमुख व त्रिपुर येतात पाया पडतात, एका बाजुला होतात, मागील पडदा पडतो. )

धूम्रमुख–इतकी महाराजांची एकदम कशानें बुवा प्रकृति बिघडली ?

त्रिपूर–त्याचें कारण तुला सगळें सांगतों ऐक. महाराज पुण्याहून मदनश्रीकृष्णजीचे येथून जोगळेकरांबरोबर त्र्यंबकास आले–

धूम्र०–जोगळेकर हे कोण ?

त्रिपूर–जोगळेकर त्र्यंबक संस्थानचे कारभारी आहेत. तेथें महाराज एके दिवशीं प्रदक्षणा घालित असतां भिंतीला म्हणून पाठ टेकायला गेले तों ती फळ्या लावून घेतलेली खिडकी होती–

धूम्र०–तें मला कळलें आहे. त्या खिडकिंतून ते खालीं चौकांत पडले, पण त्याच्यावर त्यांची प्रकृति चांगली सुधारली होती म्हणतात–

त्रिपूर–काय असेल तें असो ते गेल्या चैत्रापासूनच. आपल्या निजधामास जाण्यासंबंधीं बोलत आहेत.

धूम्र०–अगदीं स्पष्ट ?

त्रिपूर०–स्पष्ट नव्हे. परंतु त्यांच्या येथें आज पंचवीस वर्षे सारखा त्यांच्या जवळ असलेला त्यांचा कारकून माधवराव देशपांडे म्हणून आहे, तो चैत्रमासीं म्हणाला कीं, मी आपल्या वतनाच्या गांवीं जाऊन येतों, तेव्हां महाराज म्हणाले " माधवराव इतके दिवस तुम्ही मजजवळ असतां आतां महिन्यासाठीं कशाला दूर होतां ? आणि परवां तर त्यांनीं आपल्या दोन्ही भावांस आपल्या पुतण्या कडून लवकर येण्याबद्दल पत्रें लिहीलीं आहेत.

धूम्र०–ऐका. विष्णसहस्रनामाचे पाठ आतां जोरानें चालू झाले आहेत. चला आपणहि महाराजांची कांहीं शेवटची सेवा करूं ( जातात. )

पहिला प्रवेश समाप्त.

## प्रवेश २ रा.

(स्थळ—नाशिकरस्ता. वाड आणि जोगळेकर प्रवेश करतात.)

जोग०—त्र्यंबकास त्यांची कंबर सोबकल्यापासून त्यांची प्रकृती बिघडलेलीच होती. त्याच वेळेला आशा नव्हती आम्हांला. पण बिवलकर वगैरे वैद्यांनीं बरीच हुशारी दाखवून महाराजांचे वियोगदुःखापासून त्यावेळेस तरी लोकांस सोडवलें.

वाड०—जिकडे तिकडे उदास—उदास—वाटतें. अशी या जनस्थानानें उदासिनता कधीं तरी वरली असेल काय ? जो तो उदास दिसतो. जगतांतला एकच प्राणी नाहींसा झाला, पण त्याच्या करतां केवढा हा लोकांच्या मनोवृत्तित फरक ! मला तर त्या प्रसंगाची आठवण करावी तों तों गहिंवर येतो. ( गहिंवरून ) अहाहा खरा सत्पुरुष. आपल्या पाठिमागें ढाई ढाई लोकांना रडवित आहे.

जोग०—वाड, अवतारिक पुरुष म्हणतात ते हेच. भूतमात्रांवर ज्याची ममता आइबापांपेक्षां जास्त असे, जो त्यांच्या मनकामना मोठया कळकळीनें, आनंदानें, पुरवित असे, तो आपला आधार नाहींसा झाला म्हणून लोक कां बरें रडणार नाहींत ?

वाड०—आजचा काल म्हणजे असा आहे किं, कोणी कोणाची पर्वा करित नाहीं. पण तें तसें करणें अगदीं चूक आहे, आणि पृथ्विवरिल सर्व लोकांचें एकमेकांशीं बंधुत्वाचें नातें आहे, असें या महापुरुषानें आपल्या वर्तनानें सर्व लोकांस दाखविलें.

जोग०—दाखविलें इतकेंच नाहीं. तर शिकवलें सुद्धां. कितीही कोणी कवडी चुंबक असेना, महाराजांशीं संबंध आला किं, त्याचा तो कवडीचुंबकपणा गेलाच. महाराजांच्या दातृत्वाचा सर्वांवर पगडा बसून सर्व देशांत दातृत्व विलसत होतें.

वाड०—कितीही दुसऱ्या गोष्टी काढा जोगळेकर, पण महाराजांच्या त्या परवाच्या दिवसाची आठवण झाली, कि गहिंवर येतोच. ओहोहो, काय तो देखावा ! महाराजांच्या परलोकगमनाची सकाळीं वार्ता पसरल्या बरोबर काय लोकांचें प्रेम ! धांवले सगळ्या जातीचे लोक महारांचें दर्शन घेण्या करतां. जो तो गहिं-

वरून ' यशवंतराय महाराज कीं जय' म्हणे. दुसरा शब्दच लोकां-ना त्या दिवशीं माहित नव्हता. पोलिस लोकांच्या बंदोबस्ताला सुद्धां त्या दिवशीं कोणी जुमानलें नाहीं.

जोग०–महाराजांना पुष्पालंकृत करून उचललेमात्र, आणि ' यशवंतराव महाराज कीं जय ' हा गहिंवराचा शब्द होऊन सर्व रविवार पेठ दणाणून गेली ती आठवतें कां ?

वाड–महाराजांची आतां शेवटली सेवा आपल्या हातून थोडी तरी घडावी ह्मणून जो तो किती तत्पर होता त्या वेळेस ! तितक्यांतले तितक्यांत त्या सेजा बाईनें एक मखर तयार करून आणले. मिळून महाराजांच्या योग्यते प्रमाणें त्यांचा अंत्यविधी व्हावा ही सर्वत्रांची इच्छा. त्या दिवशीं जात, धर्म सर्व विसरून गेले होते. मुसलमान, पारशी, हिंदू सर्वांचा धर्म जणूं काय महाराजांचें चरण ! त्यांच्या चरणभेटीची लोकांना अतिशय गोडी.

जोग०–प्रेत संस्कार लोक अशुभ समजतात. कोणी पहायला सुद्धां धजत नाहीं तिकडे. पण या वेळेस सर्वच उलटें. जो तो महाराजाचे चरण आतां पुन्हां दृष्टिस पडायचे नाहींत. ह्मणून मोठ्या तातडिनें अगोदर महाराजांचे चरणांकडे धाव घेत सुटला. (पाहून) ही आलीच मंडळी घ्या ठरल्या बेता प्रमाणें आपल्याला मिळायला. चला त्या दिवशीच्या खडकावर जाऊन मला नेहमीं बसावेसें वाटतें. खरा प्रेमा आणि भक्ति उत्पन्न करणारा असा तोच खडक आहे. तेथें बसून पुढें महाराजाचें स्मारक कसें काय करायचें तें ठरवूं.

( बिवलकर, हडपसरकर, मुठे, चांदवडकर, परभुणे इ० येतात. )

बिव०–( पुढें येऊन ) कसें काय वाड, चला जोगळेकर ( हातांत हात घालतात. ) काय हो हाच रस्ता परवां कसा गजबजून गेला होता. रीघ नव्हती माणसांला. तशांत पेढा बर्फीची वृष्टि आणि त्यांतच सराफ लोकांनी उधळलेल्या खुर्द्यांची वृष्टि. त्या दिवशीं तर उदास वाटतच होतें, पण आतांची ही उदासिनता जास्त भासते कां चांदवडकर ?

चांदव०–अहो प्राण गेल्यावर कुडीची अवस्था काय पुसायची? तशीच या जनस्थानची अवस्था झाली आहे.

**मुठे**–( पाहून ) अहो, इकडे पहा. हा महाराज जिवंत असतां त्यांस तुच्छ मानणारा मोहन मास्तर त्यांच्या पादुकांवर मस्तक ठेऊन अश्रु ढाळित आहे. आणि हा त्याच्या शेजारी उभा असलेला त्याचा मित्र बळवंतराव चापेकर वाटतें ?

**हडप**०–काय हो या वेळेस ही गंगानदी सुनाट दिसतें ! जींत परवां हजारो दंपत्यें, महाराजांच्या चरण ओघाखालीं, अवभृत स्नानातुल्य न्हायली, तिनें सुद्धां आतां पुन्हां असा प्रसंग आपल्याला कसचा लाभणार, असेंच मनांत आणून किं काय उदासिनता धारण केली आहे.

**मुठे**–अरेरे, हीं देवळें, आाणि हें पटांगण यानींही आज उदास वृत्तिच धारण केली आहे. ( पाहून ) अरेरे, पण इकडे या तालिमबाज मोहन मास्तरची पहा काय अवस्था झाली ती. पूर्ण पश्चात्ताप झाल्या सारखा दिसतो बिचाऱ्याला. हा बळवंतराव चापेकर, त्याला 'शोक आवर' ह्मणून उपदेश करित आहे. पण तो जास्तच स्फुंदत आहे.

[ मोहन मास्तर महाराजांच्या पादुकांवर मस्तक ठेवलेला, आणि बळवंतराव त्यास उपदेश करीत आहे असा पडदा उघडतो. ]

**बळ**०–मित्रा, तुला पूर्ण पश्चात्ताप झालेला आहे, आतां शोक आवर. 'पश्चात्तापेन शुध्यंते' त्या प्रमाणें तुझी शुद्धि झाली. नुसता शोक करून काय होणार ? तूं त्यांच्या चरणांवर हात ठेऊन, प्रतिज्ञा केलीच आहेस, किं आज पासून, नाच, तमाशा वगैरेकडे मुळीं पैसा खर्च करणार नाहीं. होईल तितका सत्कार्याकडे व महाराजांच्या स्मारकाकडे खर्चिन अशी, तर त्या प्रमाणें वागलास म्हणजे त्यांत सर्व आलें. या पेक्षां उत्कृष्ट प्रतिज्ञा आणखी कोणती ?

**मोहन**०–( स्फुंदत उठून ) मित्रा तूं, म्हणतोस तें सर्व खरें, पण हा गहींवर माझ्यानें दाबवत नाहींरे ! ( दुःखाक्रोशानें ) केवढा चांडाळ मी ! महाराजांचें जिवंत असतां दर्शन घेण्याची या अधमाला कशी वासना झाली नाहीं ! हा पापी देह, ह्याचा मित्रा असा संताप येतो, कि ह्याच्या चिंधड्यान् चिंधड्या उडवून

टाकाव्या ! हा जिवंत ठेवण्याला योग्य नाहीं. अशुद्ध, अशुद्ध देह, किळस येतो आतां याचा मला. बळवंतराव, तूं माझा खरा मित्र आहेस ना ?

**सर्व**०–( एकिकडे ) अरे, अरे, अरे. याला आतां याची कृति खात आहे. बिचारा आतां काय बिचारतो आहे मित्राला ?

**बळ**०–हे तुला आणि यशवंतराय महाराजांना ठाऊक.

**मोहन**०–तर मग एक माझें काम करशील ?

**बळ**०–अरे हें काय विचारायला पाहिजे ? माझ्या आटोक्यां-तलें असलें–

**मोहन**०–अरे बाबा, तुझ्या अगदीं अटोक्यांतलेंच आहे.

**बळ**०–कोणतें ?

**मोहन**०–केलें मात्र पाहिजेस हं. न करशिल तर माझा तूं खरा मित्र नाहींस असें मी समजेन.

**सर्व**०–हा काय सांगणार आपल्या मित्राला आतां कोण जाणे !

**बळवं**०–अरे हा मी तयार आहे सांग. तुला ह्या वेळेस संतोष व्हावा एवढ्या करतां–

**मोहन**०–( मध्येंच ) अरे म्हणूनच मला संतोषविण्याकरतां जा आत्तांच्या आत्तां तालमींत. आणि सर्वांत जो मोठा मुद्गल आहे तो घेऊन ये जा. मी हा असा या पादुकांवर पडतो. आणि खरा मित्र असलास तर त्यानें माझा कपाळ मोक्षकर. जा जा. आतां एक क्षण सुद्धां थांबूं नकोस. ( त्याला ढकलतो. )

**सर्व**–बिचाऱ्याला जीव नकोसा झाला आहे. चला आपण जा-ऊन त्याचें समाधान करूंया.

**बळ**०–मी जातो मित्रा. पण एकच प्रश्न तुला विचारण्याची मला परवानगी दे. तूं महाराजांचा खरा शिष्य आहेस काय ? जर असलास तर त्यांच्या प्रमाणें तुला शांती ठेवायला शिकलें पाहिजे. अरे आत्महत्या करणारावर ते कधीं तरि संतुष्ट होतील काय ? याचा विचार करून मग काय करायचें तें कर. ( सर्व येतात. )

**सर्व**–( ' यशवंतराय महाराज कीं जय ' गर्जना होते. )

**मोहन**०—अहाहा, तेवढेच शब्द कानांला या गोड लागतात. ( मंडळीस ) बरें आलात तुम्ही. तुम्हांला एक विचारतो, तेवढे सांगा—अगदीं खरें असेल तेच सांगा. कोणाची भाडबिड ठेऊंनका. हा अशुद्ध देह, ज्यानें महाराजांचें दर्शन ते जिवंत असतां गर्वानें घेतलें नाहीं तो देह जिवंत ठेवण्यास योग्य आहे काय ? सांगा. सांगा. नाहीं म्हणून सांगाला भिऊं नका. तुम्ही सभ्य आहात. महाराजाचे खरे भक्त आहात. मी हा तुम्हांला साष्टांग नमस्कार घालतो ( तसेंकरून ) तुम्ही खरें सांगितल्या शिवाय मी उठायचाच नाहीं.

**सर्व**०—( त्यास उठवून ) वस्तादजी, आपण अगदीं खेद करूं नका. आपल्याला आम्ही खरोखर सांगतों, आपला पश्चात्तापानें देह शुद्ध झालेला आहे. तरि आपण मनांत आणलेला अविचार सोडून द्या. आणि महाराजाच्या स्मारका संबंधानें पुढें काय करावयाचें, या संबंधानें मंडळी विचार करायला चालली आहे तर तिकडे चला. (त्यास घेऊन जातात.)

अंक साहावा समाप्त.




